— ॐ —

" श्री महालक्ष्मी प्रसन्न "



रजपुतांच्या इतिहासांतील समर प्रसंगानें
नटलेलें, प्रणयसाजानें सजलेलें,
स्फूर्तिदायक नाटक.

संगीत

# " लांच्छित चंद्रमा "

[ अंक १ ते ३ ]



लेखक

आत्माराम शान्ताराम सावंत देसाओी.

कलीविहार, नेकसम्राट, मराठ्याची नेकी
या नाटकांचे कर्ते.

प्रथमावृत्ति १९५४

कृष्णजयंती शके १८७६.

किंमत १॥ रुपया

५२, वकानी हाऊस,
गोखले सोसायटी लेन,
परेल, मुंबई नं. १२

प्रकाशक :—
बाबा जामदार,
बोरी बिल्डिंग, खो. नं. २
लॅमिंग्टन क्रॉस रोड,
ग्रँटरोड, मुंबई नं. ७.



मुद्रक :—
मंगेशराव रामचंद्र शिरूर,
शिरूर प्रिन्टींग प्रेस,
१२ वी खेतवाडी,
मुंबई नं. ४.

# " लांच्छित चंद्रमा "

रजपुतांच्या इतिहासांतील एका दूरच्या कानाकोपऱ्यांत खोलवर गाडलेलें हें कथानक देशबांधवांना संशोधनाच्या प्रकाशांत उजळून दाखविल्याबद्दल श्री. आ. शां. सावंत देसाई यांना धन्यवाद!

शोधक जिज्ञासेनें जेव्हां मी या कथानकाकडे पाहूं लागलों तेव्हां माझ्या दृष्टीसमोर एका विशिष्ट तत्व प्रणालीची दिव्यप्रभा चमकूं लागली. ऐतिहासीक कथानक, पण बदलत्या काळाचा प्रवाह ओळखून नाटककार या कथानकाशीं जेव्हां एकरूप झालेला दिसला, आणि लिखाणाची शैली, विचार-आवेशासह चालू राजकीय पातळीवर केंद्रित होऊन ऐक्यता आणि राष्ट्राभिमान यांत वावरतांना दिसली त्या वेळेस अशा नाटकाला आपण अभिप्राय लिहित आहोत या बद्दलचा मला अभिमान वाटला.

अंबरच्या जोहारानंतर सिद्धराज नांवाचा अेक मुत्सदी सरदार, राणा विरमदेवाच्या अंतिम इच्छेला शिरोभागीं मानून, त्याच्या दोन अज्ञान नातवांचें पालन करतो. वयांत आल्यावर ते दोन राजपुत्र सिद्धराजाच्या सहाय्यानें मंगल पवनगडावर स्वतंत्र रित्या राज्यकारभार पाहूं लागतात. याच वेळीं मेवाडांत बंडाळी माजून वृद्ध अल्लाउद्दीनाच्या अंकित असलेले छोटे छोटे मांडलीकहि स्वतंत्ररित्या वागूं लागतात आणि या सर्वांचे पारिपत्य करण्यांसाठीं व राजसिंह व विजयसिंह या दोन भावांना पकडून आणण्यासांठीं वृद्ध सुलतान अल्लाउद्दीन आपला पराक्रमी सेनापती बहाद्दरखाँ यास कुमक देऊन मेवाडांत पाठवतो. बहाद्दरखाँ बरोबर दुर्जनसिंह नांवाचा पाताळयंत्री नीच माणूस मदतीला असतो. कर्णतोड, अबूगड, तेलंगणाचा सुभा काबीज केल्यावर बहाद्दरखाँ मंगल पवनगडावर मोर्चे लावतो. परंतु राजसिंहाच्या वृकयुद्धाच्या डावानं जेरीस आलेला बहाद्दरखाँ इडरला परततो इथून या कथानकाला आरंभ झालेला आहे.

राजसिंहाची पत्नी रंजना हिला हस्तगत करून घडलेल्या मानहानीची पूर्तता करण्यासांठीं धडपडत असलेला दुर्जनसिंह राजसिंहाच्या नकळत मंगलगडावर जाऊन विजयसिंहास भेटतो व कुटिल राजनीतीचा अवलंब करून व मेवाडच्या सम्राटपदाची लालूच दाखऊन विजयसिंहास आपलासा करतो आणि भावाभावांत वैमनस्य आणतो वगैरे प्रसंग फारच उठावदार आहेत.

आज्ञाधारक संयमी वृत्ती आणि आततायी महत्वाकांक्षी वृत्ती यांचे द्वंद्व यथार्थरीत्या या नाटकांत पहावयास मिळतें.

लेखकानं निर्माण केलेल्या सिद्धराज, राजसिंह विजयसिंह या त्रिमूर्तींना पाहून भारतमातेला स्वतंत्र करण्यांसाठीं आपल्या राष्ट्रानें निर्माण केलेल्या स्वातंत्र्य समराच्या त्रिमूर्ती महात्मागांधी, जवाहर आणि देशगौरव सुभाष यांच्या ओजस्वी स्मृति डोळ्यांसमोर तरळूं लागतात. इतिहासाचे अगतिक दास म्हणून जगण्यांपेक्षां, राष्ट्रानें त्या इतिहासाचे "कर्तुमकर्तु" स्वामी झाले पाहिजे, राष्ट्राच्या सर्वांगीण सिद्धतेसाठीं संघटना आवश्यक आहे, त्यावरच राष्ट्राची मदार आहे, हा जो दिव्योदात्त आदर्श आणि दृष्टीकोन लेखकानें मांडलेला आहे तो अत्यंत मोलाचा आणि स्तुत्य आहे.

इष्कानं पछाडलेला आलफखाँ विनोद निर्माण करणारा आहे तसाच कविहि आहे. कवि प्रतिभेच्या तारेंत जसे वडबडतात तसा आलफखाँ इष्काच्या तारेंत वावरताना दिसतो. तिसऱ्या अंकात कथानकाशीं विनोदाची सांगड उत्तम घातली गेली आहे. नाट्यकलेला पोषक असणारा विनोद श्री. आ. शां. यांनीं सहजगत्या निर्माण केला आहे. निव्वळ विनोदासाठीं विनोद असावा ही जी प्रथा सर्वसाधारण चालू लेखक डोळ्यांसमोर ठेवतात ती अयोग्य आहे. ओढून ताणून आणलेला व मूळकथानकाशीं कांहींही संबंध नसलेला विनोद नाट्यतंत्राची पातळी खाली आणून नाट्यकलेला घातक ठरत असतो हें त्यानीं ध्यानीं ठेवावें.

राजसिंहाची पत्नी रंजना आणि विजयसिंहाची प्रेयसी विजया यांच्या भूमिकेतून प्रगट झालेली कामगिरी भरीव आहे. संवादांत मार्मिकपणा असून दोघींचे स्वभाव परिपोषही वाखाणण्यासारखे आहेत.

डावावर डाव योजून राजसिंहावर मात करणारा, आणि आपलं बींग बाहेर पडल्यानंतर तितक्याच बेडरपणं विजयासिंहापुढें त्याच्या नालायकीचा पाढा वाचणारा दुर्जन, खरोखरच दुर्जन उठून दिसतो.

धवलराय व रायपाल या पात्रांच्या भूमिका एकाच माणसानं कराव्यात अशा प्रकारची योजना लेखकानं केलेली आहे. विजया व नर्तकी या दोन भूमिकाही एकाच नटीनें कराव्यात अशी योजना आहे. धवलरायाची भूमिका म्हणजे या कथानकांतील उत्तरार्धाचा एक उत्तम दुवा आहे.

राष्ट्राची ऐक्यभावना कशी असावी याचा मासला लेखकानें सिद्धराजांच्या

तोंडून वदवला आहे. अंक २ रा प्रवेश ५ व्यांत सिद्धराज म्हणतात—
"स्वतःच्या भावाविरुद्ध, स्वतःच्या राष्ट्राविरुद्ध तलवार उचलण्यासाठीं तो परकीयांना मिळाला? विजय इतका नीच असेल असं मला तरी वाटलं नव्हतं."

दुसरें एक वाक्य—

"प्रभो एकवार भारतवर्षाकडे पहा. विक्रीला काढलेल्या गुलामाप्रमाणें त्याची आजची स्थिती झाली आहे."

अंक तिसरा प्रवेश पांचव्यांत विजयासिंहास उद्देशून सिद्धराज म्हणतात—
"अरे, थोडी विशाल दृष्टी करून देशाकडे पहा; विस्कळीत झालेल्या रयतेकडे पहा, भावाच्या केविलवाण्या स्थितीची कींव नाहीं का तुला येत?"

आणि शेवटीं चालू राजकारणावर आघात करतांना हृदयाला टोंचणारं शल्य लेखक सिद्धराजांच्या तोंडून वदवतो. "राजा, विजयासिंहासारखे क्षुद्र मनोवृत्तीचे लोक अहंकाराला बळी पडले कीं देशाची शकलें होतात. विभक्त राज्य पद्धतीनं देश विभक्त होतो आणि तसा तो विभक्त झाला कीं राष्ट्राला दुबळेपणा प्राप्त होऊन शत्रू निर्माण होतात. दुष्मनांना आपली करामत गाजवायला पूर्णपणें वाव मिळतो. आणि विभक्त राज्यद्धतीनं परशत्रूंचे हल्ले परतविणे मुष्कीलीचं होतं."

वरील वाक्यें कोणत्या सहृदय माणसाच्या अंतःकरणाचा ठाव घेणार नाहींत? आज आमचे महात्माजी असते तर अशाच प्रकारचा उपदेश त्यांच्या तळमळणाऱ्या हृदयांतून बाहेर पडला असता आणि एक नवा आत्मविश्वास नवीन पिढींत संचारण्यास तो उपयुक्त झाला असता.

राजकीय नि ऐतिहासीक महत्व विषदवून सांगणारे हें बोधप्रद नाटक शौकीन उत्साही मंडळाना खचीत आवडेल! अशी स्फूर्तिदायक नाटकें रंगभूमीच्या मंचावर नाचूं बागडूं लागली तर तिचे भवितव्य तेजोमय आहे खास!

तरुण लेखकाचा हा "लांच्छित चंद्रमा" पुनवेच्या शुषमायूत चंद्राप्रमाणं विलसीत होवो व उरीं बाळगलेली त्यांची गोड आशा साकार होवो, आणि बहुजन समाजाला जागृत करणारं असं सणसणीत वाङ्मय लिहिण्यास त्यांना स्फूर्ति मिळो हिच सदिच्छा!

सोलापूर,
ता. २०-८-१९५४

**ना. म. कोतवाल**
**बी. ए. (ऑनर्स).**

# " आभार "

---

श्री. सदाशिवराव चितळे, शान्तारामराव शिर्के माझे आहेत. प्रस्थावनाकार पूज्य अण्णासाहेब कोतवाल माझे. शिरूर प्रिन्टींग प्रेसमधील श्री. पाटीलही माझेच तसेंच प्रकाशक श्री. बाबा जामदार माझेच. श्री. शांतारामराव सावंतही माझेच. सूज्ञ वाचक आणि प्रेक्षकही माझेच. अेकाच मायभूमीची आम्ही लेकरें. आमच्या आयुष्याची रोपटीं याच भूमींत उगवलीं नि वाढलीं आणि याच भूमाऊलीच्या उदरांत मरणाची अखेरची मिठी पडायची आहे आमची.

— मग आभार मानायचे तरी कुणाचे ? — आणि ते कशाला ?

ता. २०-८-५४
कृष्णजयंती, शके १८७६.

— नाटककार,

माझे परमपूज्य चुलते ती॥ भिकोबा बापू सावंत देसाऊी,

रिटायर्ड पोलीस सबइन्स्पेक्टर, ठाणा,

 यांचे पूज्य चरणीं ही 

नाट्यकृतांजली,



कृ
त
ज्ञ
ता
पू
र्व
क

अ
र्प
ण

 ————, आत्माराम.

## — पात्र — परिचय —

---

| | | | |
|---|---|---|---|
| १ | राजसिंह | — | पवनगडचा राजा |
| २ | विजयसिंह | — | मंगलगडचा राजा [राजसिंहाचा धाकटा भाऊ] |
| ३ | सिध्दराज | — | राजसिंह व विजयसिंहाचे पालनकर्ते. |
| ४ | दुर्जनसिंह | — | एक सामान्य सरदार. [यवनांस फितूर झालेला] |
| ५ | बहाद्दरखाँ | — | सुलतान अल्लाउद्दीनचा सेनापति. |
| ६ | आलफखाँ | — | बहाद्दरखाँचा मेहूणा. |
| ७ | रायपाल | — | पवनगडचा सेनापति. |
| ८ | धवलराय | — | मुसलमान सैनिकाच्या वेषांतरांत दुर्जनच्या छावणींत वावरणारा पूर्वीचा तेलंगणाचा सेनापति व विजयेचा सहाय्यक. |
| ९ | रंजना | — | राजसिंहाची पत्नी. |
| १० | विजया | — | विजयसिंहाची प्रेयसी. |

**सैनिक, जासूद वगैरे —**

— ॐ —

॥ श्री महालक्ष्मी प्रसन्न ॥

संगीत

# " लांच्छित चंद्रमा "

अंक १ ते ३

## अंक पहिला

### प्रवेश १ ला

—: ईशस्तवन :—

ॐ जय जय जय श्री कुलस्वामीनाथ।
स्तवन करी तव प्रफुल्ल नाट्य मंडळ।
वंदुनि वंद्य पाद ॥ धृ० ॥
भक्तिच्या हाके विनविती दयाळा।
मागणें ते आमुचे, बा अखंड भारत।
निर्विकार निराकार देई वरदान।
करी साकार, ध्येय आमुचे ॥ ॐ ॥



( पडदा वर जातो. पवनगडावरील राजसिंहाचा महाल. सिद्धराज एका उच्च आसनावर बसलेलें आहेत. राजसिंह जवळ उभा आहे. )

**सिद्धराज** :— राजा, अितक्या तडकाफडकी बहादूरखाँ अिडरला जाण्याचं कारण ?

**राजसिंह** :— गुरुदेव, त्याला मिळणारी बाहेरची रसद मीं तोडली होती. शिवाय मंगलगडाकडील दुर्जनचा सारा रिसालाही विजयसिंहानं अचानक कापून काढला.

**सिद्धराज :**—शाब्बास रणबहाद्दरानों ! तुमच्या पराक्रमानं आणि असामान्य वीरत्वानं बहाद्दरखाँ चारी मुंड्या चीत झाला म्हणायचा !

**राजसिंह :**— गुरुराज, हें आपल्याच प्रभावाचं प्रतिक आहे. आपण आमच्यावर मायेची पाखर घालून मार्गदर्शन केलंत आणि त्यामुळेंच —

**सिद्धराज :**— माझी तपश्चर्या तुम्ही फळाला आणाल होय ना ? अेकाच मुसंडीनं बहाद्दरखाँनं कर्णतोड विध्वंस केला, अबूगडच्या परमाराला मातीला मिळवलं, अजयगड हस्तगत केला, तेलंगणाच्या नरपतीस धूळ चारली आणि मोठ्या उमेदीनं त्यानं पवन-मंगलगडावर मोर्चे लावले. बेट्याचा डाव अखेर हुकला ! पवन-मंगलगडच्या सिंहानीं त्याची उमेद खच्ची केली. नाउमेद होवून अिडरला गेला ! शाब्बास रणबहाद्दरानों शाब्बास ! तुमच्या कर्तृत्वानं लवकरच —— राजा हें काय ? या वेळीं तूं कसल्या विचारांत मग्न झाला आहेस ?

**राजसिंह :**— छे ! छे ! गुरुराज ! परमेश्वराचे छायेप्रमाणं आपण आमच्या पाठीशीं असतांना ———

**सिद्धराज :**— वेड्या, हें माझ्या प्रश्नाचें उत्तर नव्हे ! कुठल्या चिंतेनं मनीं ठाण दिलं आहे तें मोकळ्या मनानं सांग.

**राजसिंह :**— गुरुदेव ! आपण सर्व जाणतच अहात ! गेले कांहीं दिवस माझं कूलगोत्र आमच्या पूर्वजांचा इतिहास जाणून घेण्यांची मनीं अनावर उत्कंठा लागली आहे. [गुरुदेव स्तब्ध रहातात] ती हकीकत ऐकतांना माझ्या मनाचा बांधारा कोलमडून पडेल याची का धास्ती वाटते आपणाला ?

**सिद्धराज :**— [सुस्कारा टाकून] राजा, अंत:करणांत त्या आठवणींनं उडालेली खळबळ थोपवून धरण्यांचा प्रयत्न करीत होतो. वत्सा, नावाचा इतिहास आणि इतिहासाचं नांव या वांचून तेथें आतां कांहींच शिल्लक नाहीं. मोंगलांचा सैतानीं नाच तिथं वावरतो आहे. ज्यानीं हातावर शीर घेऊन राष्ट्रांसाठीं आपल्या रक्ताचा सडा घातला ; त्यांची आठवण मात्र या हृदयांत जतन करून ठेविली आहे. आणि त्याच आठवणींनं [गहींवरतात] बेटा ! तुझा आजा विरमदेव

हा अंबरच्या राज्याचा वारस. त्याला चितोडाधिपती अजयसिंहाची बहीण कनकदेवी दिली होती. सत्तेच्या लालसेनं मदांध बनलेल्या खिलजीची विध्वंसक नजर विरमदेवाकडे वळली. अंबरचा किल्ला जमिनदोस्त झाला. विरमदेव, आपल्या एकुलत्या एक मुलासह धारातीर्थी पडला. तूं चार वर्षांचा आणि विजय सहा महिन्यांचा असतांना तुझ्या मातेनं, राणी विमलदेवीनं तुम्हाला माझ्या स्वाधीन केलं. गडावर जोहार झाला आणि राजसिंहा, दुःखी अंतःकरणानं तुम्हां दोघांना घेवून रातोरात मीं जयपूरच्या जंगलाचा आश्रय घेतला. पुढं तुझ्या वयाच्या आठव्या वर्षी कनकदुर्गाधिपती मृगेंद्ररायाच्या आग्रहास्तव तुम्हांला त्याच्याकडं ठेवलं. पण त्याच्याही मागं सुलतानाचा ससेमिरा लागला. त्याची पत्नी राणी मंगला अल्लाउद्दीनाच्या वासनांध दृष्टींतून सुटूं शकली नाहीं. तिच्या अभिलाषेनं मृगेंद्ररायाचा दग्यानं खून झाला. त्याचा कावा समजतांच मंगलेनं मला बोलावून आपल्या कन्येसकट तुम्हां दोघांना माझ्या स्वाधीन करून वीर रमणीनं शत्रूशीं सामना करता करता मृत्यूला कवटाळलं. पुढं मीं तुम्हां तिघांना घेऊन पवनगडच्या जंगलांत वास्तव्य केलं. मेवाडच्या हमीरानं हा दुर्ग माझ्या स्वाधीन केला. आणि त्याच्याच सल्ल्यानुसार कुणाला संशय येवूं नये म्हणून मीं राजाश्रया-खालीं असलेल्या श्री चंडिकेश्वराच्या पुजाऱ्याचं काम पत्करलं. श्री चंडिकेश्वराची आराधना आणि तुमचं शिक्षण हाच माझा व्यवसाय होता. क्रमाक्रमानं तुम्हांला तारुण्य प्राप्त झालं. योद्धयाच्या वेषांत वारंवार सज्ज करून आसपासच्या जंगलांत तुम्हांला फिरवूं लागलों. आणि त्या नंतरची हकीकत बेटा, तुला ठावूकच आहे !

**राजसिंह** :— [ सद्गदीत होवून ] भयानक ! फारच भयानक !! गुरुदेव— [ अकदम त्यांच्या पायांवर डोकें ठेवतो ]

**सिद्धराज** :— [ कुरवाळीत ] वत्सा ! — [ विजया प्रवेश करते ]

**विजया** :— [ वंदन करून ] बाबा ! आलांत तरी कधीं ? आणि हें काय ? भाईच्या डोळ्यांत आसवं ? भाई, तुझ्या पराक्रमानं दिपून बहादूरखाँनं पलायन केलं. तुझं कौतुक करायला प्रत्यक्ष बाबा आले ! आणि तूं असा — !

**सिद्धराज :—** बेटी, तुझ्या भाईच्या डोळ्यांत गतकालचा क्रूर इतिहास अुभा राहिला आहे.

**विजया :—** आणि त्या भयानक दृष्यानं माझा भाई भेदरला, असंच नां ?

**राजसिंह :—** [ उठून ] वेडे पोरी, तुझी कल्पना चुकीची आहे. ही आसवं दुर्दैवाच्या करूण कहाणीचीं द्योतक आहेत खरीं ; पण त्यांतही भविष्याची अुज्वलता ओसंडून वहात आहे.

## [ पद १ लें ]

**विलसत मनीं ही थोर भावना ।**
**रम्य दिसे नयना ज्ञात किमया ॥ धृ० ॥**
**ध्येयाचा तो अफाट सागर ।**
**दूर क्षितिज नीळी भुलावण ।**
**पथ दुःखाचा अंगिकारून ।**
**हंसत पाहीन जीवन दर्शन ॥ धृ० ॥**

गुरुदेव, खरोखरच आपण अवतारी पुरुष अहांत ! या अनाथ पोरक्या पोरांना राज्यांत उभं रहायला सुद्धां जागा नव्हती, त्यावेळीं शत्रूपासून आमचं रक्षण केलंत ! विजये, परमार्थात अष्टौप्रहर गढून गेलेल्या संसार विरागी गुरुदेवानीं आमचा पोटच्या मुलांप्रमाणं संभाळ केला, म्हणूनच आम्हांला आज हे दिवस दिसले !

**सिद्धराज :—** राजा, ते माझं कर्तव्यच होतं. राणी त्रिमलादेवीच्या शब्दाला मी जागलों. अंबराधिपतीची मरणकालची इच्छा मी पूर्ण केली. बेटी, तुझ्या मातेच्याही ऋणांतून मला मुक्त व्हावयाचं होतं.

**विजया** :— म्हणजे — ? आपल्या बोलण्याचा आशय मी नाहीं समजलें !

**सिद्धराज** :— बेटी, तूंही एका नरशार्दूलाची कन्या आहेस. अल्लाउद्दीनाच्या कपटी कारस्थानाला तुझा पीता बळी पडला. आणि ज्या वीरांगनेनं मरणाला कवटाळलं त्या कनकदुर्गाधिपतीची राणी मंगलादेवीची तूं सुपूत्री आहेस.

**विजया** :— सुपूत्री — ? नाहीं नाहीं ! मी खरोखरच दूर्दैवी आहे. माझ्या मातापीत्यालाही पहाण्यांचं भाग्य —

**सिद्धराज** :— [ तिला कुरवाळून] बेटी, वर्षाची असतांना तुझ्या मातेनं तुला माझ्या स्वाधीन केलं. आर्यवीरांगना होती तुझी माता ! जावूंदेत ती कहाणी ! तो कालही संपला. आतां भविष्यकाळ तुझ्या हातीं आहे. तूं दूर्दैवी नाहींस बरं ? उद्यां मंगलगडची स्वामिनी झाल्यावर —

**विजया** :— हें हो काय बाबा असं ? अशानं मी तुमच्याशीं कधींच बोलायची नाहीं.

**राजसिंह** :— स्त्रीया रूसल्या म्हणजे त्या अधीक सुंदर दिसतात हें खोटं नाहीं तर — ?

**विजया** :— बघ हं भाई, फिरून माझ्या वाटेला गेलास तर — !

**सिद्धराज** :— विजये, इतकी मोठी झालीस तरी तुझा अल्लडपणा अजून गेला नाहीं. बेटा, तुला आनंद होणं स्वाभाविक आहे, पण त्याचबरोबर तुझी जबाबदारीही तूं आता ओळखायला शिकलं पाहिजेस. संसाररूपी जीवनाची नौका कुशलतेनं तडीला नेणं, पतीच्या किर्तीत भर घालणं हेंच आर्य स्त्रीयांचं मोठं भूषण आहे बेटा.

**विजया** :— बाबा , —

## [ पद २ रें ]

**अजि वाहिली देहमाला । भूषण ह्या पदाला ॥ धृ० ॥**
**देश प्राण तोचि त्राण । हाचि समजूनि दिव्य मंत्र ।**
**जतन करिन हृदयी बोल । करिन साध्य जे असाध्य वाटे ॥ १ ॥**

**सिद्धराज :—** शाब्बास बेटी ! हीच अपेक्षा मी तुझ्यापासून करीत आहे. जा आतां. [ विजया वंदन करते ] अखंड सौभाग्यवती भव ! [ विजया जाते ]

**राजसिंह :—** गुरुदेव, बहादूरखाँच्या जाण्यांत मुत्सद्दीपणाची गुरुकिल्ली असावी, असा मला दाट संशय येत आहे. आणि म्हणूनच विजयसिंहाकडे सरदार मृगेंद्ररायाच्या सल्ल्यानेच राज्यकारभार पहावा अशा आशयांचा लखोटा सेनापति बरोबर रवाना केला आहे.

**सिद्धराज :—** ठीक केलंस. [ उठून ] राजा, तुला आतां सांगण्यांसारखं कांहींच नाहीं. देशाला संभाळ. लाखों लोकांच्या कल्याणाचा भार तुझ्यावर आहे. देश हा मोठा आहे, देशाचं महत्व अष्टौप्रहर अंतःकरणांत जागृत ठेव. देशव्रताची पूर्तता करणं आतां या पुढं सर्वस्वी तुमच्या हातीं आहे.

**राजसिंह :—** गुरुदेव, तें महाव्रत तर मी केव्हांच अंगिकारलं आहे. आपला पूर्ण आशीर्वाद असावा. [ वंदन करतो ]

**सिद्धराज :—** भारतवर्षातील पवित्र संस्कृतिची ज्योत विझत चालली आहे, अशावेळीं वत्सा, नुसत्या आशीर्वादाच्या ढालीवर विसंबून रहाण्यांपेक्षां स्वतःच्या हुषारीवर आणि कर्तबगारीवर विसंबून रहा. श्री चंडिकेश्वर तुमचं रक्षण करो ! [ आशीर्वाद देतात. पडदा पडतो. ]

---

## [ प्रवेश दुसरा ]

[ अिडरच्या छावणीबाहेरील अेक रस्ता. बहादूरखाँ व आलफखाँ प्रवेश करतात. ]

**बहादूरखाँ :—** आलफ, आखीर हम लोग विजय नहीं पा सके ! अितना परिश्रम किया भारी तुफान मचाया लेकिन ये बहादूरोनें हमें बहोत तंग करदिया । परेशाना बिगर हम कुछ नहीं पा सके ।

**आलफखाँ :—** यह आप कैसी दिल्लगी उडा रहे हो ।

**बहादूरखाँ :—** पागल ! अिसे तू दिल्लगी कहता है ? अब तो कोअिभी रास्ता नहीं है । परेशानीसे मैं तो बिलकूल दिवाना बनता जा रहा हूँ.

**आलफखाँ :—** अिसमें परेशानी कौनसी ? आपका रास्ता तो बिलकूल साफ है । सुलताननें तो सबकूछ देखा ही है ।

**बहादूरखाँ :—** मतलब — ?

**आलफखाँ :—** ये उँचे उँचे गड । मेवाडकी रुपवान किन्नरियाँ ..........

**बहादूरखाँ :—** चूप रहो पागल । जान निकलनेका वख्त आया तो भी तू इष्कके ढंगमें मगन ? मैं सोच रहा हूँ अैसी कौनसी तरकीब निकल जाय कि उस तरकीबसे ये दो भाई मेरे पंजेमें मिलेंगे । [ दुर्जनसिंह प्रवेश करतो ] दुर्जनजी, जंग करते करतेही मेरा जीवन बीत गया ! मैंनें कभी हार नहीं पायी । अभी तेलंगण का सुभा जीतकर अबूगडपर चढाअी की । अजयगड मिट्टीमें मिला दिया । लेकिन अिन् दो बहादूरों की वीरता देखकर मैं बिलकूल ताज्जुबमें पडा हूँ । या हरामखोरानीं आमचा दील बेचैन करून सोडलाय तर तिकडं शहेनशहानं आमच्या पाठीशीं तगादा लावला आहे.

**दुर्जनसिंह :—** समशेर जंगाच्या समशेरीची कदर सम्राटाना नाहीं ! आश्चर्य आहे.

**बहादूरखाँ :—** आणि त्या आश्चर्यात आमच्या नेकीचा, शौरत्वाचाही दुर्लौकीक आहे.

**आलफखाँ :—** अरे बहादूर, सुलतान तो सिर्फ लुटही चाहते है ।

**बहादूरखाँ :—** लेकिन मेरा फर्ज जंग की फत्तेही करना है । दोस्त, अभी कुछ अैसी तरकीब निकालो कि जिसकी वजहसे तुम्हाराही मंसब पूरा हो जाय । और ये बहादूरखाँ को तख्त् के सामने अपना सीर उँचा करनेका मोका मिल जाय ।

**आलफखाँ :—** हाँ, दुर्जनजी ! मुझे भी कुछ अैसा मोका मिल जाय कि बस् —!

**दुर्जनसिंह :—** हुजूरानीं घाबरण्याचं कांहीं कारण नाहीं. आपली मोहीम यशस्वी करण्याकरितां हा दुर्जन प्रयत्नांची पराकाष्ठा करील. बोला —, शत्रूचं रण कौशल्य आपल्या लक्षांत आलं आहे असं भासवून त्यास सावध करणं चांगलं कीं, आपणांस त्याचा गंधही नाहीं असं भासवून अैन वेळीं त्याला पालथा घालणं चांगलं ?

**बहादुरखाँ**
**आलफखाँ** } [दोघेही] अैसी कौनसी तरकीब बाकी है ?

**दुर्जनसिंह :—** आहे ! अेक तरकीब आहे ! भेदनीतीनं विजयसिंहास आपल्या गुहेंत आणून दांत व नखें काढून घेण्याची मसलत या दुर्जननं योजिली आहे. शत्रूच्या अक्कलमंदीला अक्कलमंदीनंच टोला दिला पाहिजे.

**बहादुरखाँ :—** लेकिन दुर्जनजी, विजयसिंह तुमच्या कारवाईला बळी पडेलच कशावरून ?

**दुर्जनसिंह :—** हुजूर, अवघ्या आठशें मोंगल वीरांनिशीं देवगिरीच्या रामदेवाला धूळ चारणाऱ्या खिलजीच्या तालमींत हा दुर्जन तयार झाला आहे. अुघड्या मैदानांत शत्रू नामोहरण होत नसेल तर भेदनीती आणि दगलबाजी या दोन मार्गांचाच अवलंब केला पाहिजे. विजयसिंह शूर आहे पण तितकाच तो आततार्इ आहे. दुबळ्या मनाच्या विजयासिंहास त्याच्या स्वावलंबीपणाला जाग देवून आमच्या साहाय्यानं मेवाडचं तख्त् मिळवून देण्याचं अमीष दाखवायचं. वडील भावाची हुकमत तो मानींत नाहीं ! आणि याचाच फायदा घेवून या वेळीं फितूरीनं आपलं कारस्थान उरकायचं.

**आलफखाँ :—** जरूर ! क्यौं नहीं ! वाहवा दुर्जनजी, आपने तो सब भेदहि निकाल दिया। बहादुरखाँ, ही मोहीम आपणाला फत्ते करायची आहे. शिवाय मेवाडच्या साऱ्या औरता या आलफखाँच्या पायाशीं नमल्याच पाहिजेत.

**बहादुरखाँ :—** अबे पागल, जहन्नमें जाने दो तेरी औरत ! दुर्जनजी, क्या आप अैसा करोगे ?

**दुर्जनसिंह** :— जरूर ! बंदा एका पायावर उभा आहे.

**बहाद्दरखाँ** :— तो याद रख्खो कभी कामयाबी नहीं हुयी तो आपकी गर्दन चली जायगी ।

**दुर्जनसिंह** :— अलबत ! हुजूरापाशीं एक विनंती आहे. आमच्या बरोबर आलफखाँ असतिलच ?

**आलफखाँ**:— म ऽऽऽ म ऽऽऽ मै ........... ?

**बहाद्दरखाँ** :— हाँ ! हाँ ! अिसमे डरनेकी कौनसी बात है ? मेवाडकी परियाँ तो मिलेंगी ।

**दुर्जनसिंह** :— खानसाहेब, हत्तीचं मस्तक आणि सिंहाची छाती बनवा, पऱ्या, पऱ्या, काय ? पऱ्या पायावर लोळण घेतील लोळण !

**आलफखाँ** :— अैसा ? तो जरूर मै आपके आगेही रहूँगा । बहाद्दर, तुम फिक्र मत करो ।

**दुर्जनसिंह** :— हुजूर, माझी कारवाई मी सुरू करतोच. दरम्यान सुलतानांकडून अधीक कुमक मागवावी आणि ती येईपर्यंत हुजूरांनीं अिथंच स्वस्त बसावं. ठरल्याप्रमाणं हा बंदा विजयसिंहाला घेवूनच आपल्या मुलाखतीला हजर होईल. [ कुर्निसात करतो. ]

**बहाद्दरखाँ** :— बहोत अच्छा ! आपकी रायसे मैं सहमत हूँ ।

[ सर्वजण जातात. ]

---

## [ प्रवेश ३ रा ]

( राणा विजयसिंहाचा महाल. अेराझारा घालीत असलेला विजयसिंह मधून मधून तलवारीच्या मुठींशीं खेळत आहे. त्याच्या मुखावर मंदस्मीत तर मधून मधून नीग्रही, करारी स्वभाव दृग्गोचर होत आहे. मध्येंच अेकाअेकी तलवार उपसून तो ती स्वताः भोंवतीं फिरवीतो. )

**विजयसिंह :—** विजयसिंहाच्या विजयी तलवारीस आज चारी दिशा मोकळ्या झाल्या. [तलवारीचीं दोन टोकें दोन्हीं हातांनं धरून ती गुढघ्यावर धरतो.] बहाद्दरखाँ ! मोंगल सेनापति रणमस्त बहाद्दरखाँनं तुझ्यापुढं हात टेकले. ज्यांच्या ज्यांच्या विरुद्ध मी तुला म्यानविरहित केली, त्या सर्वांना तूं आपल्या तेजानं दिपवून टाकलंस. आतां तूं स्वस्थ विश्रांती घे. [ तलवार म्यान करतो ] दादासाहेब ! आपला भाग्योदय, आम्हां रजपूतांचा भाग्योदय अगदीं समीप आहे. खिलजीच्या मदांध सरदारांच्या जुलमी सत्तेचा बळी पडून साऱ्या मेवाडभोंवतीं स्वतंत्रतेचं, शांततेचं आणि आनंदाचं साम्राज्य आता लवकरच पसरेल. थोड्याच दिवसांत हा विजय मेवाडच्या अभिनव राज्याची उभारणा करील

## [ पद ३ रें ]

**विश्व शांत प्रलय शांत । धैर्य स्फुरलें**
**हृदयीं अमाप ॥ ध्रु० ॥ चंद्रिका ती**
**अंतराळी । स्वैर विहरत मोदे ।**
**उधळुनियां अमृत कुपीला । स्वातंत्र्ये**
**बागडे । प्रशांत या समयीं ॥ १ ॥**

आत्मबलाच्या उंच गिरीशिखरावरून मेवाडच्या स्वातंत्र्य-सूर्याची किरणं या विजयसिंहास अगदीं स्पष्ट दिसत आहेत. मेवाड ! आम्हां रजपूतांची मातृभूमी मेवाड ! आज पारतंत्र्याच्या खाईंत जळत असलेला मेवाड स्वतंत्र होणार ! या विजयसिंहाच्या हातून स्वतंत्र होणार ! [ एक सैनिक येतो व मुजरा करून—]

**सैनिक** :— सरकार, कोणी मोंगल सरदार आपल्या मुलाखतीला आले असून बाहेर आपल्या हुकूमाची वाट पहात आहेत.

**विजयसिंह** :— मोंगल सरदार! [ विचार करून ] जा पाठवून दे त्याना [ सैनिक मुजरा करून जातो ] माझ्या मुलाखतीला मोंगल सरदार! मतीला कांहींच उमज पडत नाहीं! [ अेराझारा घालूं लागतो. कांहीं वेळानं आलफखाँ व दुर्जनसिंह आणि त्यांच्या पाठोपाठ नजराणा घेतलेला एक मोंगल सैनिक प्रवेश करतात. ]

**आलफखाँ**
**दुर्जनसिंह** } बंदगी महाराणा! [ आलफखाँ व दुर्जनसिंह मुजरा करतात. मोंगल सैनिक निघून जातो. ]

**विजयसिंह** :— बंदगी सरदारसाहेब! मोंगल सरदार म्हटल्यानं आम्हीं प्रथम बुचकळ्यांत पडलों. आपल्या मुलाखतीचा प्रकार?

**दुर्जनसिंह** :— मित्रत्वाचा!

**विजयसिंह** :— जरूर जरूर आम्हीं तुमचं असंही स्वागत करूं.

**आलफखाँ** :— महाराणा, आपकी यह उदारता का मै ———

**विजयसिंह** :— खानसाहेब, माझा गौरव करण्यांचं कांहींच कारण नाहीं. शत्रू नीतिमान, औदार्यशील आणि परहीतेतसूक असेल तर हाडाचा अस्सल रजपूत त्याच्याबरोबर औदार्यानंच वागेल. बोला. कां येणं झालं?

**दुर्जनसिंह** :— राणाजी, आपण जी दंगल अुडवून दिलीत त्यामुळं बहाद्दरखाँच्या भोंवतीं सारं ब्रम्हांड फिरायला लागलं. आपणांशीं खुल्या दिलानं वागून मैत्रीचा करार करण्यांस ते राजी आहेत.

**विजयसिंह** :— सरदारसाहेब, एकूण आपला गैरसमज झालेला दिसतो? दंगल माजवून स्वतःचा मतलब साधण्यांसाठीं मी पुंडगिरी चालविलेली नाहीं.

**दुर्जनसिंह** :— छे! छे! हें काय भलतंच राणाजी? माझ्या म्हणण्याचा

आशय तसा नाहीं. फक्त मेवाडला खरंखुरं स्वातंत्र्य प्राप्त व्हावं या एकाच हेतूनं आपण ———

**विजयसिंह :—** त्यासाठींच तर शीर तळहातांवर घेवून आम्हीं समरांगणीं उतरलो आहोत.

**आलफखाँ :—** महाराणा, आता त्याची आपणाला कांहींच जरुरी नाहीं.

**दुर्जनसिंह :—** आपलं हे दुर्घट कार्य यशस्वी करण्याच्या कामीं मित्र म्हणूनच आम्हीं आमचा हात पुढं करीत आहोंत. आमच्याकडून आपणांस एकादा नामी उपाय ———

**विजयसिंह :—** सरदार साहेब, खऱ्या लोकशाहीची प्राणप्रतिष्ठा करण्यांचा एकच मार्ग आहे आणि तो म्हणजे प्रजेच्या मनीं त्यांच्या पायांत गुलामगिरीच्या शृंखला ठोकणाऱ्या सत्ताधिशाविषयीं भयंकर चेव निर्माण करणं हाच !

**दुर्जनसिंह :—** अगदीं खरं आहे राणाजी ! तरी···पण खवळलेली प्रजा अविचारी बनते. आणि अविवेकानं बेफाम झालेली जनता लोकशाहीच्या नाशास कारणीभूत होत असते ?

**विजयसिंह :—** सरदारसाहेब, प्रजेला आपल्या कर्तव्याच्या पडलेल्या विस्मृतींतून जागं करणं हेंच आमचं आजचं कर्तव्य आहे. कर्तव्यांत मृत्यू म्हणजे वीराचं वीरोचीत स्वागत ! उद्याचा विचार आज नाहीं.

**दुर्जनसिंह :—** मान्य आहे मला पण ———

**विजयसिंह :—** प्रजा सुखी आणि स्वतंत्र ठेवण्याचं सामर्थ्य राजांच्या राजदंडांत नसतं अगर सरदारांच्या समशेरींतही नसतं ! प्रजेचा उद्धार जागृतींत होत असतो. त्याला नामी उपायाची जरूरी लागत नाहीं सरदारसाहेब !

**दुर्जनसिंह :—** राणाजी, जरा स्पष्ट बोलतो क्षमा असावी. एकाच बाजूनं विचार करून चालत नाहीं. गतकालच्या इतिहासाकडं पहा. राष्ट्राच्या उत्कर्षास

जनतेपेक्षां शूर व्यक्तिच कारणीभूत झालेल्या आहेत. प्रजा फार तर तुमच्या प्रयत्नाला मदत करील.

**विजयसिंह** :— मतलब —— ?

**दुर्जनसिंह :—** आपण आज मोंगल सत्तेच्या नरडीवर हात घातलात, तिचे प्राण कासावीस केलेत, ते काय निव्वळ प्रजेच्या बहादुरीवर ? राणाजींचा त्यांत कांहींच वाटा नाहीं ?

**विजयसिंह** :— आपलं म्हणणं तरी काय ?

**आलफखाँ** :— भाई साहब, आपकी वीरता मुगलोंकी ताकदको बरबाद करके अपने पहाडी किलेकी दीवारपर पहराती रही है। सुलतान अैसीही समशेर चहाता है।

**विजयसिंह** :— [ स्वगत ] सुलतान अैसीही समशेर चहाता है !

**दुर्जनसिंह** :— राणाजी, मोंगल आपल्या मैत्रीची अपेक्षा करीत आहेत. आपला हात पुढं करून आमच्याशीं दीलजमाई करावी.

**विजयसिंह** :— दीलजमाई ? तुमच्याशीं दीलजमाई ? लुटारूंशीं दीलजमाई ? ते शक्य नाहीं. ! सरदार साहेब तुमचा रस्ता तुम्हांला मोकळा आहे.

**दुर्जनसिंह** :— राणाजी, त्या साठींच तर मोंगल सेनापति आलफखाँ मित्र म्हणून आपल्या भेटिला आले आहेत !

**विजयसिंह :—** मित्राची भेट वीर या नात्यानं आम्हीं घेतली. मित्र म्हणून तुमचं आम्हीं केव्हांही स्वागत करूं ; पण राष्ट्राच्या ईभ्रतीचा प्रश्न आला कीं मात्र, तुम्हीं आम्हीं शत्रूच राहूं.

**आलफखाँ :—** कैसी बातें करते हो आप ? महाराणा, देश काल, और पात्र देखकरही शक्ति का व्यवहार किया जाता है।

**दुर्जनसिंह :—** राणाजी, आपलं सामर्थ्य मौगलांच्या लक्षांत आलं आहे. खिलजींकडून आपल्या केसालाही यापुढं धक्का लागणार नाहीं. राष्ट्राची संपत्ती आणि त्याचा दर्जा अगदीं सुरक्षीत राहील ! शिवाय आपण ———

**विजयसिंह :—** चालू असलेल्या रक्तपात आणि बेबंदशाहीला आळा बसेल ?

**दुर्जनसिंह :—** जरूर !

**विजयसिंह :—** दगलबाजीनं लुबाडून नेलेलं आमचं स्वातंत्र्य आम्हांला परत मिळेल ?

**आलफखाँ :—** क्यों नहीं महाराणा ? जरूर मिलेगा ।

**विजयसिंह :—** मेवाडला पूर्ण स्वातंत्र्य आणि चोख न्याय हवा आहे !

**दुर्जनसिंह :—** तो देण्याचा आपल्याच हातीं आहे. राणाजी, आपल्या अटी आम्हांला बीनशर्थ मान्य आहेत. आपल्या प्रभावी शक्तिचं सहाय्य घेवून विस्कळीत झालेल्या मेवाडला राणाजींच्या अधिपत्याखालीं ठेवण्यांचा खुद्द सुलतानाचा मनसुबा आहे. आपण येथील राजनवर्गात अत्यंत शूर, उदार, आणि विद्वान अहांत ! साऱ्या मेवाडला आपल्या अधिपत्याखालीं राबवण्यांचं सामर्थ्य फक्त आपणांतच आहे !

**आलफखाँ :—** हाँ, महाराणा, आप तो मेवाडके नेक काम वीर हो । राजस्थान के ये छोटे छोटे राजाओं को आप खिलौने की तरह कुचल देंगे ।

**दुर्जनसिंह :—** होय राणाजी ! कोणत्याही राणापेक्षां आपली योग्यता अधीकच आहे. शिवाय आपणांसारख्या नीतिमान, उदार शूर पुरूषाविषयीं आम्हांला अत्यंत आदर वाटत आहे.

[ एक सैनिक येवून मुजरा करतो. ]

**सैनिक :—** पवनगडावरून रायपाल आले आहेत.

**विजयसिंह :—** खानसाहेब, आपण जरा आंत व्हा. [ दुर्जन—आलफखाँ आंत जातात. ] जा पाठवून दे त्यांना. [ सैनिक जातो. सेनापति रायपाल प्रवेश करून मुजरा करतो ] काय खबर आहे पवनगडची ? दादासाहेब कुशल आहेतनां ?

**रायपाल :—** होय राणाजी. सर्व वर्तमान ठीक आहे. आम्हां गरीबांना विसरूं नका असा ताईसाहेबांचाही सांगावा आहे.

**विजयसिंह :—** रायपाल, तुमच्या ताईसाहेब फारच शंकेखोर बुवा !

**रायपाल :—** राणाजी, अंतरीच्या प्रेमाला एकच ध्यास लागलेला असतो आणि त्यामुळंच तें बहुधा शंकेखोर बनतं ! [ दोघेही हंसतात ]

**विजयसिंह :—** बरं कांहीं विशेष —— ?

**रायपाल :—** राणाजी, बहादूरखाँनं वेढा उठवून तोंडघशी पाडण्याची युक्ती योजिली आहे. दबा धरून बसलेला दुष्मन फिरून कसा उलटून पडेल त्याचा नेम नाहीं.

**विजयसिंह :—** सेनापति, आमची समशेर समर तांडव करीत असतांना भविष्य कालीन भाक्तितांची तुम्हांला डर वाटावी ? आज आमच्या मर्दुमकीनं शत्रू पूरा जेरीस आला आहे. आणि या पुढंही त्याचं कंबरडं मोडण्याची ताकद या आमच्या बाहूंत आहे. [ रायपाल लखोटा देतो. विजयसिंह मस्तकाला लावून तो परत रायपालकडे देतो ] वाचा ! [ आसनावर बसतो. रायपाल लखोटा वाचतो. ]

**॥ श्री महादेव श्री चंडिकेश्वर ॥**

श्री सहस्त्रायु चिरंजीव अखंडित लक्ष्मी अलंकृत राजश्रिया विराजित राजमान्य राजेश्री मंगलगडाधिपती विजयसिंह राजे, प्रति राजेश्री महाराज राजसिंह राजे याजकडोन आशीर्वाद. इकडील कुशल क्षेम. लेखन कारण, आपण केलेल्या कर्तबगारीनं आम्हांसी बहोत आनंद

झाला. कपट बुद्धी मनीं धरोन बहाद्दरखाँनें वेढा उठविला. तरी सावध रहावें. राज्या उपरीं आम्हीं बहुता रीती तुम्हांसी समजाविलें आहे. आपण सुज्ञानीं अहांत. पुढील होष्यमान जाणोन होशियार रहाणें. आमचे व श्रीचे विचारानीं आपण खालील प्रमाणें यापुढें चालले असतां आपणाशीं फार श्रेयस्कर आहे. वख्त् बाका आहे. तरी दरखदार व कामदार यांचे इतल्याशिवाय कामकाज होवूं नये. दरबारांत खलेल करूं नये. भूषण देवून चालवावें. शागीर्दपेशा मंडळी चांगली कुलीन ईमानी कृपेंत ठेवावी. राज्यांत बातमीदार नेमून दुसऱ्यास न समजतां दुष्मनांची हालचाल आणित असावें. पागा, रयत होशियार ठेवावे. चाकरीचा राबता नित्य ठेवून राज्यांत गाफिली येवूं देवूं नये. राज्यकारभारांत वयोवृद्ध सरदार मृगेंद्रराय यांसीं हातीं धरून त्यांचे सल्ल्यानेंच राज्यकारभार पहावा. आपण जनतेचे प्रतिनिधी रहावें. असें झाल्यास तुमचेबद्दलची खातरजमा आम्हांसी व श्रीशी होवून मंगलगडची रयताही सूख पावेल ! बहुत काय लिहिणें !

आज्ञापत्र ———

राजाधिराज राजसिंह राजे.

**विजयसिंह** :— [ स्वगत ] तुमचेबद्दलची खातरजमा आम्हांसी होवून रयता सूख पावेल ! [ उघड ] अविश्वास ! एकूण दादासाहेबांना आमच्याबद्दल अविश्वास वाटतो आहे तर ——— !

**रायपाल** :— नाहीं राणाजी ! हा अविश्वास नाहीं. असें केल्यानं येथील रयतेचा आपणांवर विश्वास बसेल आणि आपण बसविलेली घडी बिघडणार नाहीं असंच महाराजांना ———

**विजयसिंह** :— म्हणजेच आम्हीं नलायका आहोंत असंच दादासाहेबांना

वाटत आहे नां ? [ दुर्जन व आलफखाँ प्रवेश करतात त्यांना पहातांच रायपाल दचकतो. ]

**दुर्जनसिंह** :— अपमान ! राणाजींचा हा उघड उघड अपमान आहे.

**आलफखाँ** :— हाँ महाराणां, आपला अुत्कर्ष दादासाहेबांना सहन होत नाहीं असंच दिसतं.

**रायपाल** :— चूप रहा हरामखोरा ! महाराजांची निंदा आणि माझ्या समक्ष....? [ आलफखाँची गर्दन धरायला धांवतो ].

**विजयसिंह** :— [ उठून ] सेनापति ! [ रायपाल थांबतो ].

**दुर्जनसिंह** :— [ हंसून ] रायपालजी, राणाजींच्या अनुज्ञेनंच आम्ही अिथं आहोंत बरं ?

**रायपाल** :—[ भांबाहून ] राणाजींची अनुज्ञा ! राणाजी, प्रत्यक्ष दुष्मन आपल्या छामीयान्यांत वावरतो आहे—!

**विजयसिंह** :— रायपाल, पंचाननाच्या गुहेंत लांडग्यांनी राहूटी केली म्हणून पंचानन कांहीं घाबरत नाहीं ! आज दुष्मन मित्र म्हणून आला आहे ; आम्हीं त्याचे जरूर स्वागत करूं. उद्यां तो रणांगणीं अुतरला तरी तिथंही आम्हीं त्याचं स्वागत करूं.

**रायपाल** :— आणि तो कुटिल नीतिनं गुहेंत शिरला असला तर—?

**विजयसिंह** :— त्याची शहानिशा पटली तर गुहेसकट त्याला जमीनदोस्त करूं.

**दुर्जनसिंह** :— रायपालजी, झाली ना खात्री !

**आलफखाँ** :— मैने जींदगीमें अभितक अैसा शेर कभी नहीं देखा था ! धन्य हो महाराणा आपकी धन्य !

**रायपाल :—** तरीपण राणाजी, ही वेळ मानापमान शोधायची नव्हे ! महाराजांचा—

**विजयसिंह :—** रायपाल, अजूनपर्यंत दादासाहेबांच्या प्रत्येक हुकूमाची आम्ही तामीली करीत आलो, त्याचा अर्थ असा नव्हे कीं पदोपदीं दादासाहेबांनी आम्हाला बाहुले समजून नीतिमत्तेचे धडे शिकवावेत ? माझ्या राज्यांत मी वाटेल तें करीन हा माझा सांगावा दादासाहेबांना जावून सांगा.

**रायपाल :—** अशा आणिबाणीच्या वेळीं राणाजी, महाराजांच्या हुकूमाची आपणाकडून अमान्यता होते आहे !

**विजयसिंह :—** हुकूम ! हा विजय कुणाचेच हुकूम मानीत नसतो.

**रायपाल :—** राणाजी, ———

**विजयसिंह :—** बस् —! पुरे करा हा चोंबडेपणा ! चालते व्हा इथून.

**रायपाल :—** क्षमा असावी या सेवकाला. मायदेशाच्या स्वातंत्र्यासाठीं लढणारा मी महाराजांचा एक इमानी पाईक आहे. राजाज्ञेनुसार आपणाला कर्तव्याची जाण करून देणं हें माझं कर्तव्य होतं —

**विजयसिंह :—** सेनापति ! तुमची सल्ला मला नको. माझी सल्ला म्हणजे ही माझी समशेर आणि तिची सनद फार वेगळीं आहे.

**रायपाल :—** आणि ती परिणामी आपल्याच नाशाला कारणीभूत होणार आहे.

**विजयसिंह :—** चूप, तोंड आवर हरामखोरा ! राजदूत म्हणून आलास हेंच या वेळचं भाग्य समज. [ सेनापति निघून जातो ] खिलजीसारखा विख्यात लुटारू आमची लायकी जाणतो आणि दादासाहेबांना आमचा अविश्वास वाटतो. वारे नशीब ! [ आसनावर बसतो ]

**दुर्जनसिंह :—** राणाजी, स्वार्थापुढं माणसाला दुसऱ्याची किंमत कळत नसते. असं मनाला लावून घेवूं नये !

**आलफखाँ :—** हाँ, महाराणा ! हम होते हुअे आपको ईतनी परेशानी नही होनी चाहिये थी ।

**विजयसिंह :—** खानसाहेब, आमच्या अटी आपणाला मान्य आहेत ?

**आलफखाँ**
**दुर्जनसिंह** [ मुजरा करून ] मेवाड सम्राटांचा जयजयकार असो.

**विजयसिंह :—** ठीक आहे. आम्हीं यावर जरूर विचार करूं.

**दुर्जनसिंह :—** शत्रूंचीही अंतःकरणं काबीज करणारा आपणासारखा नरशार्दूल सम्राट होण्याकरितांच जन्मलेला असतो. [ फिरून दुर्जन व आलफखाँ मुजरा करतात व जातात. ]

**विजयसिंह :—** ( उठून ) शत्रूंचीही अंतःकरणं काबीज करणारा आपणा-सारखा नरशार्दूल सम्राट होण्याकरितांच जन्मलेला असतो. बस् ! बहाद्दरखाँ सारखा शिष्ठाचारी, दीलदार आणि मोकळेपणानं वागणारा अेक सरदार शत्रू असण्यापेक्षां दादासाहेबांसारखे दहा जुल्मी राजे शत्रू असलेले पुरवतील !

## [ पद ४ थें ]

**हा जरी दुष्ट भुजंग त्वेषें उभारूनि फणा ।**
**आतूर झाला दंश कराया। परि न**
**क्षिति मी ठेचीन त्याला ॥ धृ० ॥**
**तारांगण गगनी बिंबले, द्विगुणित शोभा**
**हृदयी खुलते । प्रकाश दिसता, लक्षी**
**मी तयाला ॥ १ ॥**

[ पद संपतांच — पडदा पडतो ]

---

## [ प्रवेश ४ था ]

मंगलगडच्या हद्दीबाहेरील अेक जंगल पायवाट.

[ दुर्जन व आलफखाँ प्रवेश करतात. ]

**दुर्जनसिंह** :— खानसाहेब, द्या टाळी ! आपली अर्धी अधिक मोहीम फत्ते झाली. अखेर गळाला मासा लागला. आतां फांस असा आवळतो कीं या फांसाच्या पकडींत गवसलेल्या विजयसिंहाचा चेंदा मेंदा झाला पाहिजे. [ भेसूर हास्य ]

**आलफखाँ** :— [ अेक लांब उसासा टाकतो. ]

**दुर्जनसिंह** :— कां ? अिस वख्त् आपकु यह क्या हुआ ?

**आलफखाँ** :— क्या कहूं दोस्त । मैंने बहोत बडी गलती की । सच कहूं दोस्त ? मेरे बिबीकी अब मुझे याद आयी । सैंकडो परिओंके लिये मैंनें बडी मनिषा लाकर ये जंगपर आया ; लेकीन ना परी ना शादीकी बिबी । बिचमें फक्या मार रहा हूँ ।

**दुर्जनसिंह** :— मग त्यांत काय झालं ? ती ही संवय असलेली चांगलीच !

**आलफखाँ** :— क्या कहां ?

**दुर्जनसिंह** :— नाहीं नाहीं म्हटलं मुळांतच जिथं कांहीं नाहीं तिथं फक्या मारलेल्या कांहीं अजिबात वाईट नाहीं ?

**आलफखाँ** :— तूं तो मजाक उडा रहा है । अबे, प्रत्तेक जंगमध्ये आमची फत्ते झाली । एकादी परी हातीं मिळेल म्हणून मोठ्या अुमेदीनं सर्वांच्या आधीं गडाच्या आंत जावं तो काय ? अहो अिथल्या या पोरीना दुसऱ्यावर प्रेम कसं करावं हेंच कळत नाहीं । अिधर के अभागिन स्त्रियोंने और कुछ नहीं सीखा । केवल जोहार करना ही सीख लिया है । अहांहां ! कितनी खुपसुरत थी । दोस्त, अजूनही या नजेरसमोरून ती ढळत नाहीं बघ.

**दुर्जनसिंह** :— कोण ? ती तेलंगणाची राजकन्या ?

**आलफखाँ :**— हां हां तीच ती। दोस्त मैंने बहोत गलती की। तुम पीछे थे। सबके आगे मै दौडा था। लेकिन अपसोस। मुँझे देखतेही वे अंगारमें कुद पडी। आणि शेवटीं या खूपसुरती आलफखाँला मुंज्या म्हणून परतावं लागलं. वाटतं आपणही आतां अशी मिठी मारुन जोहार करावा। [ दुर्जनला मिठी मारतो ]

**दुर्जनसिंह :**— [ मिठी सोडवून — स्वगत ] वाटतं याची कवड्या सारखी मुंडी मुरगळावी. पण काय करूं ?—माझी कार्यभाग झाला पाहिजे नां !

**आलफखाँ :**— खरंच दोस्ता, आतां माझ्याच्यानं बिलकुल दम धरवत नाहीं. या ईष्काच्या रोगानं तडफडून मरण्यापेक्षां एकाद्या गुलनार पोरीनं नाजूक हातानं या गळ्यावर सुरी फिरवली तरी चालेल। पण तशीही पोर कुठं मिळत नाहीं. तुमच्या या देशांत तर पोरींचा अगदीं शुकशुकाट।

**दुर्जनसिंह :**— खानसाहेब, मोंगल सम्राटाला सतरा स्वाऱ्या कराव्या लागल्या अेका पद्मीनीसाठीं !

**आलफखाँ:**— सतरा स्वाऱ्या ! अे मेरे अल्ला ! तो फिर तेरा ये बंदा मरही जायगा।

**दुर्जनसिंह :**— [ स्वगत ] मरशील तर बेहत्तर !

**आलफखाँ :**— आणि असल्या भानगडींत जर मी मेलो तर —— ! दोस्त कित्तेक पोरींच्या अिच्छा अर्धवट रहातील !

**दुर्जनसिंह :**— तर मग हिम्मत धरा. लवकरच आपली अरमान पूरी होओील आता.

**आलफखाँ :**— अरे येह फूका आशीर्वाद क्या काम का ?

**दुर्जनसिंह :**— मग आम्हीं अेवढी जीवापाड मेहनत करतो ती कुणांसाठीं

तर ? खानसाहेब, विजयसिंहाची भावी पत्नी विजया पवनगडावर आहे. अगदीं तेलंगणाच्या राजकन्येचाच नमूना आहे. एकदाची आपली फत्ते झाली कीं, तें पाखरूं या पायावर लोळण घेअील लोळण !

**आलफखाँ** :— क्या कहां ? मेरे पाँवपर गिरेगी ? नहीं नहीं ; दुर्जनजी मै तो अुसे अपने गले लगावूंगा। कहूँगा "मेरे गुलनार प्यारी तुमनें मुझे अपना बनालिया। तेरा यह सौंदर्य मुझे घेर रहा है। तेरी यह जहरली साँस मुझे शिथील बना रही है। तेरा यह रूप देखकर मै मुग्ध हो रहा हूं। और अुसके उपर तुम मुझे अपने रूप, मधूरस्वर चुम्बन और अलिंगनसे निहाल करती रहो प्यारी।"

**दुर्जनसिंह** :— वाहवा ! बहोत अच्छा ! वो तो खुशिसे पागल बन जायेगी !

**आलफखाँ** :— शाब्बास। फिर मै अुसकी प्यार से हात पकडकर [ दुर्जनचा हात आपल्या हातांत घेतो ] अुसे पूछुँगा, प्यारी, बता दे। वृक्ष' अितने विविध पत्र - पुष्पोंसें क्यों विकसीत हो उठता है ? सागरके वृक्षस्थलमें इतनी फेन - पूर्ण तरंगे क्यों अुछल आतीं है ? बताव प्यारी ; आकाशमें यह चंद्रमां इतना क्यौं हँस रहा है ? यदी भूख और प्यास का मिटना अिस जीवन की चरम लील है; तो, अहार अितना सरस और स्वादिष्ट होनेका क्या प्रयोजन होता है ? प्यारी फूलों की सुगंध अितनी मधूर होनेका क्या मतलब है ? संगीत अितना मधूर क्यौं बना हैं ? जानती हो सब ........ ?

**दुर्जनसिंह** :— जी हां ! जानता हूँ !

**आलफखाँ** :— प्यारी, यह सब केवल तुम्हारे लिये ही बना है। चलिये, हम नाट्य शाला में चलें ! जीवन की मजा लूटेंगे। कितनी मधूर... है...... यह — [ बेभान होवून, डोळे मिटतो ]

**दुर्जनसिंह** :— हां, हां ! चलिये खाँसाहब ! चलिये !

**आलफखाँ :—** [ शरमून भानावर येतो. ] चलिये ! [ दोघेही जातात. ]

---

## प्रवेश ५ वा

[ पवनगडावरील राणी रंजनादेवीचा महाल. राणी रंजना व विजया बोलत बसलेल्या आहेत. ]

**विजया :—** देवी, अशा रीतीनं बावानीं सर्व इथंभूत हकीकत निवेदन केली.

**रंजना :—** [ अुठून ] खरंच गडे ! कित्ती कित्ती आनंद झाला हें सारं अैकून ! आर्यपुत्र अंबरच्या गादीचे खरे वारस ! अहांहां ! —

### [ पद ५ वें ]

**गगनांगणीं विलसे शशि चंद्रमा ।**
**लाजुनि निज सांवरी । तारकांकित अंचला ॥ धृ० ॥**
**प्रेमिजनांना रतिवसने ती ।**
**चुंबूनिं हृदयीं धरी मधु रागिणी ।**
**खेळवी भ्रमर्वा, कुणि हांसुनि ।**
**सुख सागरी रिझवूं मना ॥ धृ० ॥ १ ॥**

माझ्या मनाचा उल्हास द्विगुणित करणाऱ्या या माझ्या सखीला अशी हृदयाशीं धरून बागडावं असं वाटतंय् [ तिचा हात धरून तिला अुठवते ]

**विजया :—** खरंच ! अग, पण हा मान माझा नव्हे ! भाअीचा आहे तो !

**रंजना :—** चल, वात्रट कुठली ! [ तिचा हात सोडते. ]

**विजया :—** आणि भाई ? अरसिक असंच नां ?

**रंजना :—** नको ग माझ्या कर्मवीराला असं कांहीं बोलूंस ! दिसतं तसं नसतं. आम्हां बायकांना पुरुषांची जबाबदारी कशी ती कळतच नाहीं. सदान् - कदा आम्हीं बायका आमचा फायदा पहात असतों.

**विजया :—** वां वां ! ही भाओीची तरफदारी चालली आहे वाटतं !

**रंजना :—** विजये, आम्हां स्त्रियांचं प्रेम नजरेच्या बाहेर जावूं शकत नाहीं. पुरुषाच्या प्रेमानं नजरेच्या टप्प्यांतच रहावं असं आम्हां स्त्रियानां नेहमीं वाटत असतं ! प्रेमळ पोरी, तूंही अुद्यां एका वीरपुरुषाची पत्नी होणार आहेस. राजे लोक सुखासाठीं, परिवाराच्या प्रेमांत गुंतून चैन भोगण्यांसाठीं जन्माला आलेले नसतात. ते जर तसे वागतील तर त्यांना राजा तरी कोण म्हणेल ? राजानें स्वतःच्या सुखदुःखापेक्षां प्रजेच्या सुखदुःखाची काळजी वाहिली पाहिजे. ते कर्तव्य करीत असतांनाच खरे राजे शोभतात आणि ती शोभा पाहूनच त्यांच्या परिवारानं आनंद मानला पाहिजे !

**विजया :—** [ स्वगत ] कोण ही आपलेपणाची आंस ! कोण हे हिचे उदात्त विचार ! ! [ उघड ] धन्य देवी, तुझी धन्य !

## [ पद ६ वें ]

**भासमान ही जणूं देवता, मज होई ।**
**अुधळीत सुमना नव चैतन्या ॥ धृ० ॥**
**धिरोत्त वद हे, शमवी भिरूता ।**
**तम मनींचा दूर सरला । प्रकाश**
**दिसता नव प्रभाती या ॥ १ ॥**

देवी, आज तूं मला दिशा दाखविलीस. देश आणि त्याच्या गरजा भागविणाऱ्या माझ्या भाओीला तुझ्या सारखी प्रेमळ थोर मनाची पत्नी लाभली, कित्ती भाग्यवान आहे माझा भाओी ! प्रेमाच्या मोहजालांत न गुंतता, राजकुलावर पडलेल्या

जबाबदारीतूंन राजाला सहिसलामत बाहेर काढण्यांचा हा तुझा उपदेश, ही विजया या हृदयांत जतन करून ठेवील. भाईला दूषण दिल्याबद्दल माझा राग तर नाहीना आला तुला ?

**रंजना :—** [ विजयेला जवळ घेवून ] हें काय भलतंच ! माझ्या लाडकीवर मी रागावेन अशी शंका तरी कशी आली तुला ? [ राजसिंह प्रवेश करतो ] अगबाई ! [ डोकीवरील पदर सारखा करते ] विजये, चोर पावलांनीं यायची संवय चांगली नव्हे हं !

**राजसिंह :—** घरचा धनी चोर ! खासा न्याय आहे हा !

**विजया :—** वहिनी, इथून तिथून सारे पुरुष सारखेच बघ !

**राजसिंह :—** अरे बापरे ! असं आम्हीं केलं तरी काय ?

**विजया :—** म्हणे काय केलं ! एका कर्तव्याच्या पाठीमागं धावतांना दुसऱ्या कर्तव्याकडं अगदींच पाठ फिरवायला नको कांहीं !

**रंजना :—** असं ग काय विजये ? दरबारी कामामुळं अिकडं क्षणाचीही पुरसत होत नाहीं आणि शिवाय मोहामुळं कर्तव्यभ्रष्ट होण्यांची भीति असतेच.

**राजसिंह :—** अरे पण तुम्हीं दोघींनीं हें मांडलय तरी काय ? थोडसं आम्हांला बोलूं तरी द्याल कीं नाहीं ?

**विजया :—** भाअी, इथं तुझी दमदाटी चालायची नाहीं हं ! हा दरबार नव्हे ?

**राजसिंह :—** बरं तर – राहिलं बुवा !

**विजया :—** अस्सं ! आतां गुन्हेगारानं आपला कबुली जबाब द्यावा. आम्हीं दोघींजणीं बोलत असतांना गुन्हेगाराला इथं गुपचूप यायचं कारण ? राजभगिनीचा हा उपमर्द गुन्हेगारानं जाणूनबुजून केलेला आहे ! आणि त्याची शिक्षा फार कठोर आहे !

**राजसिंह** :— कसूर झाली. बंदा राजभगिनीच्या शिक्षेस पात्र आहे.

**विजया** :— तर मग ही राजभगिनी हुकूम करीत आहे कीं, गुन्हेगार मजकुर यानं महाराणीचा हात आपल्या हातीं घेवून उद्यां सूर्योदयापर्यंत महाराणीच्या महालांत बसून रहावे. मात्र या महालांतील फूल कोमेजून जाणार नाहीं याची खबरदारी घ्यावी.

**राजसिंह** :— अेकदम कबूल ! [ राजसिंह रंजनेचा हात आपल्या हातीं घेतो — रंजना लटक्या रागानं डोळे टवकारते. विजया व राजसिंह हंसतात. विजया निघून जाते. ] कां ? मौनव्रत घेतलंय् कीं काय आतां ?

**रंजना** :— इतकं कांहीं नको हिणवायला ? म्हटलं शासन कर्त्यांशीं नेहमीं जपूनच बोलावं. [ दोघेही हंसतात. ] खरंच ! या वेळीं माझी आठवण कशी बरं झाली इकडं ?

**राजसिंह** :— दमला भागलेला जीव विसाव्यासाठीं आसरा शोधीत असतोच ना ?

## [ पद ७ वें ]

**शीत तेवी शान्त। मन मधूर कोमल।**
**अमर भास ॥ धृ० ॥ हे मम जीवित।**
**भाव मनोरम। जाअी चितारीत।**
**हर्ष अुरोज मनी। किरण भास ॥ १ ॥**

आतां कळलं नां ?

**रंजना** :— अशा गोड थापानीं मीं कांहीं फसायची नाहीं म्हटलं ! तसंच कांहीं काम असल्याशिवाय ———

**राजसिंह** :— [ तिचे दोन्हीं हात हातांत घेवून ] अगदीं बरोबर ! तूं राजसिंहाची राणी आणि मी राजा येवढ्याच सुखांत तूं समाधान मानीत आहेस

खरी ; पण त्यांत विशाद मानण्यांसारखं काय आहे ? प्रजेच्याच कल्याणासाठीं आपण रात्रंदिवस झटत आहोंत. देवी, मनीं झालेल्या आनदांत तुलाही सहभागी करावं ; थोडावेळ मजेत घालवावा, म्हणूनच मी आलों आहे ! बोल आतां तूं मला स्वार्थी तर म्हणणार नाहींस ना ?

**रंजना :—** हें काय भलतंच बोलायचं तें ? [ राजसिंहाला आसनावर बसवते ]

## [ पद ८ वें ]

**संशय कां तव हृदय कोटरीं ।**
**गर्द–गगन तीव्र तिमिरीं । हर हरला त्या समरीं ॥ धृ० ॥**
**विरहित सखया तुझी रे भोळी । झुरते काया**
**ही तुजसाठीं । ओढ अंतरीं ॥ १ ॥**

मग आर्यपुत्रानां आजच असं कां बरं वाटावं ?

**राजसिंह :—** देवी, अैक तर ; आमच्या वाडवडीलांचा सारा वृत्तांत गुरुदेवांनीं सांगितला. जयपूरच्या गादीचे आम्हीं खरे हक्कदार आहोंत.

**रंजना :—** आतांच मला सांगितलं विजयेनं हे सारं. नाथ, या पुढं आतां प्रत्येक पावूल सावधगिरीनंच टाकलं पाहिजे !

**राजसिंह :—** देवी, मी माझ्या ध्येयाच्या शिखरानजिक येवून पोहोंचलों आहे. तरीपण समोर दिसणारी भयाण दरी मला आ करून भेडसावित आहे ! खरं संकट अजून पुढंच आहे !

**रंजना :—** पवित्र कर्तव्य बजावीत असतां संकटाची तमा धरून कसं चालेल ?

**राजसिंह** :— खरं आहे तुझं म्हणणं ! कर्तव्य बजावीत असतां निर्दय काळानं माझ्या मानेवर कुऱ्हाड चालविली तरी मी त्याची तिळमात्रही फिकीर करणार नाहीं. मला खेद होईल पण तो ———

**रंजना** :— नाहीं, नाहीं, नाथ ! ज्या राष्ट्रांसाठीं आपण या संकटांनां तोंड देत आहांत ; दूर्धर प्रसंगाशीं मुकावला करून हें थोर कार्य करीत अहांत तें कार्य अितकं नीच खचित नाहीं. आर्यपुत्रा, मी ही आपली धर्मपत्नी आहे. तशीच वेळ आली तर आपलं हें पवित्र कार्य यशस्वी करण्यांकरितां प्रथम ही रंजना आपल्या पंचप्राणांची कुरबानी करील !

**राजसिंह** :— [ उठून ] शाबास ! वीरकुमारी शाबास ! ! [ तिला जवळ घेवून ] तुझ्या या अुत्तेजनक भाषणानं मला या वेळीं किती उत्साह वाटूं लागला आहे ! हातीं घेतलेल्या कार्याच्या प्रचंड भाराखालीं माझं हृदय दडपून गेलं आहे. तुझे असे उत्साहजनक बोल ऐकले ; तुझ्या मुग्ध सहवासाचा क्षणभर आस्वाद घेतला, माझ्या या प्राणाच्या देवतेकडं डोळे भरून पाहिलं म्हणजे माझा सारा शीण निघून जातो ! हृदयांतील निराशेचं धूकं नाहींसं होवून पुढं पावूल टाकण्यांस दुप्पट आवसान चढतें !

**रंजना** :— खचीत ! राष्ट्रकार्यास वाहून घेतलेल्या आपणांसारख्या वीरावर प्रेम करण्यांत भाग्य आहे. आपल्या कार्यात वाटेकरी होण्यांत भाग्य आहे. संशयाच्या व संकटाच्या प्रसंगी आपणाला धीर देण्यांत भाग्य आहे, आणि आपणांवर आलेल्या सुखदुःखाशीं समरस होण्यांतही भाग्य आहे. नाथ, आपण सुखाच्या शिखरावर विराजमान झाला असतां, मी जशीं आपलं अर्ध आसन सुशोभित करीन, तशीच आपण संकटाच्या खाअींत सांपडला असतां मोठ्या अभिमानानं आपली सहगामिनी होईन ! स्त्री स्वभावानुसार मला डामडौलाची सत्तेची आवड असेल, पण केवळ या गोष्टीमुळंच मी आपणावर प्रेम करते असं समजूं नका ! याहीपेक्षां उच्च उज्वळ आणि दिव्य असे अनेक गूण माझ्या रायाच्या ठिकाणीं आहेत आणि त्यावरच ही रंजना प्रेम करते आहे ! [ राजसिंहाच्या छातीवर आपलं मस्तक टेकून डोळे मिटते. ]

**राजसिंह** :— धन्य, धन्य, रंजने ! तूं धन्य आहेस ! आणि तुझ्या प्रेमाला पात्र झालेल्या मला मी धन्य समजतों !

**रंजना** :— या विशाल हृदयाचा आसरा मला मिळाला, खरोखरच मी धन्य होय ! [ नगाऱ्यावर टिपरी पडते. रंजना दूर होवून खिडकीतून वांकून पहाते. तिला सेनापति रायपाल येत असतांना दिसतो. ] महाराज, सेनापति येत आहेत.

**राजसिंह** :— रायपाल आले ! ठीक झालं. [ सेनापति रायपाल प्र. क. मुजरा करतो. ] काय खबर आहे विजयची ? कुशल आहे ना तो ? [ आसनावर बसतो. ]

**रायपाल** :— होय महाराज.

**राजसिंह** :— लखोटा वाचला त्यानं ?

**रायपाल** :— होय महाराज.

**राजसिंह** :— शाबास वीरश्रेष्ठ ! विजयसिंहाच्या मदतीनं आणि आपणां-सारख्या स्वामिभक्त धुरंधराच्या सहाय्यानं हा राजसिंह कळीकाळालाही नमवील. कां आपण गप्प कां ? कठोर भवितव्यतेवर मी मात केली म्हणून तर आपणांला आचंबा वाटला नाहीं ना ?

**रायपाल** :— [ स्वगत ] या महात्म्याला कोणत्या तोंडानं सांगू ! आणि सांगू तरी काय ?

**रंजना** :— रायपालजी, अजूनही आपण स्तब्धच ?

**रायपाल** :— क्षमा असावी महाराणी. जीभेवरचे बोल आंत घुटमळताहेत ! महाराज, या स्वामीभक्ताची जीभ अमंगळ सांगाव्यानं विटाळली जाण्यां आधीं [ जंबीयावर हात घालतो ]

**राजसिंह** :— सेनापति, तुमच्या राण्याची आज्ञा आहे. घडलेला प्रकार खुल्या दिलानं आमचे कानीं घाला.

**रायपाल** :— [ मुजरा करून ] महाराज विजयसिंहजीनी शत्रूशीं संधान बांधलं.

**राजसिंह** :— [ एकदम उठून ] काय ! विजयसिंहानं शत्रूशीं संधान बांधलं ?

**रायपाल** :— होय महाराज. कपटी दुर्जनच्या घरभेदीपणानं राणाजींचं अधःपतन पराकोटीला पोंहोंचलं आहे. नजराणे बहाल करून कुटील भेदनीतिनं त्यानं राणाजीवर आपलं जाळं टाकलं आहे. आपल्या सल्ल्याची राणाजींना जरूरी नाहीं. त्यांची सल्ला त्यांची तलवार आणि तिची सनद, स्वबांधवांच्या रक्तानं लिहीली जाणार हाच सांगावा सांगण्याकरितां ह्या सेवकाला राजदूत म्हणूनंच जीवदान मिळालं !

**राजसिंह** :— दुर्जन विजयसिंहाच्या दरबारांत ! यक्षिणीची कांडी फिरल्याप्रमाणं हें घडलं तरी कसं ?

**रायपाल** :— काय सांगू महाराज ! डोळ्यांनीं पाहिलं कानानीं ऐकलं तेंच महाराजांना निवेदन केलं.

**राजसिंह** :— आमचा सांगावा सांगताना तो सैतान तिथं हजर होता ?

**रायपाल** :— होय सरकार ! त्याच सैतानानं हा आपला अपमान आहे असं राणाजींना भासवून दिलं. सरावानं या स्वामीनिष्ठाचे हात सरसावले खरे, पण राणाजींच्या आज्ञेनं ते पंगु झाले !

**राजसिंह** :— काय ऐकतो आहे मीं हें ? त्यापेक्षां हें मस्तक दुभंगून त्याच्या चिंधड्या कशा नाहीं उडत अजून ? [ डोक्यांतील केस चुरगळतो. ]

**रायपाल** :— शान्त व्हा महाराज शान्त व्हा.

**राजसिंह** :— शान्त होवूं ? ज्याच्या पराक्रमावर आमची मदार होती, त्याच विजयनं तोंडाला काळीमा फांसल्यावर शान्त राहूं ? जुलूमगिरीची भयंकर पिशाच्चें सभोंवार नाचत असतां; कुलस्त्रियांच्या अब्रूचा बाजार आमच्याच रक्तमासाचे भाइबंद मांडीत असतां, शांत राहूं ............... ?

**रायपाल** :— [ स्वगत ] नाहीं, नाहीं जगाच्या इतिहासांत या राष्ट्रभक्तिला तोड नाहीं !

**रंजना** :— नाथ, राष्ट्राच्या संसाराचा धनीच जर असा धैर्यहीन होवूं लागला तर सबंध राष्ट्राचा उत्साह मावळणार नाहीं का ?

**रायपाल** :— महाराज, मेरू प्रमाणं अचल, दर्यासारखा धीरगंभीर........ असा आपला निर्धार ! असं असतां आपणच जर असे हताष ——

**राजसिंह** :— रायपाल, पण त्याच दर्याच्या पोटीं वणवाण्डळानं पेट घेतला कीं, धीर—गंभीर दर्याही मोकाट धांवत सुटतो.

**रायपाल** :— नाहीं महाराज मनोनिग्रहाचा तो महामेरू वणवाण्डळाला शमविण्याकरितांच उग्र रूप प्रगट करीत असतो.

**रंजना** :— महाराज, असं निराशेनं भांबाहून जाणं म्हणजे मात्र आपल्याच हातानं दूर्दैवाचा फांस गळ्याभोंवतीं आवळून दूर्दैवाच्या न कळत होणाऱ्या सहाय्यावर दुगाण्या झाडण्यासारखंच नाहीं का ? संकटाचं निवारण करणं मानसिक बलाबलावर अवलंबून असतं असं आपणच नेहमीं म्हणता ना ?

**राजसिंह** :— [ निश्चयी मुद्रेनं ] सेनापति, राखीव शिबंदीला सुसज्ज रहाण्याची आज्ञा द्या. विजयसिंहाला कैद करायचं आहे हें लक्षांत ठेवा. [ विजया प्रवेश करते. ]

**विजया** :— [ दचकून ] काय...............? त्यांनीं तुझा असा अपराध तरी काय केला ? [ सेनापति मुजरा करून जातो. ]

· **राजसिंह** :— वेडे, माझा अपराध केला असता तर एक सोडून दहा वेळ

विजयला या राजसिंहानं क्षमाच केली असती ! पण विजये, साऱ्या राष्ट्राचा अपराध करून विजयनं आपल्या नांवाला आणि कीर्तिला काळोखी फांसली आहे.

**विजया** :— असं केलं तरी काय पण त्यांनीं ?

**राजसिंह** :— राष्ट्रद्रोह !

**विजया** :— नाहीं नाहीं ! ते, असं करणं शक्य नाहीं ! भाई, तुझा कांहींतरी गैरसमज झाला आहे. देशाच्या प्रेमानं तूं इतर बाबतींत अंध झाला आहेस !

**रंजना** :— विजये ! लहान तोंडीं मोठा घांस ........... !

**विजया** :— [ तिला बिलगून ] देवी, खरंच भाईला देशाच्या प्रेमापुढं———

**राजसिंह** :— बंधू प्रेम दिसत नाहीं असंच ना ? वेडे, प्रेमांत आणि मायेंत गुंतून गेलो असतों तर देशाला स्वत:चा प्राण समजणं या तुझ्या भाईला शक्य झालं नसतं. राष्ट्रापुढं व्यक्तिविषयक नात्याचे हितसंबंध विसरून गेलंच पाहिजे. मायेच्या बंधनांत सांपडून कर्तव्य – पराङ्मुख होण्यांपेक्षां मायेची बंधनें झुगारून देण्यांतच कर्तव्याची खरी कसोटी असते !

**विजया** :— भाओ ——— [ त्याला जाऊन मिठी मारते. ]

**राजसिंह** :— [ तिला कुरवाळून ] सारं कळतं मला बेटा ! पण थोड्याशा चुकीमुळं देशाचं भवितव्य बदलून कसं चालेल ? अधिकाऱ्यांच्या चुकीमुळें देश रसातळाला जातो ! राज्य हे अेकट्याचं नव्हे ! प्रेमाचे धागेदोरे अशावेळीं तोडलेच पाहिजेत ! शत्रूशीं हात मिळवणीं करून पारतंत्र्याच्या खाईत देशाचा डोंब पेटवणाऱ्या अधमांच्या अमंगळ कृत्यांना वेळींच पायबंद घातला पाहिजे ! रक्ताचं नातं देशापुढं तुच्छ आहे. वेडे, कर्तव्य कठोर असतं पण त्या कठोरपणांतही कर्तव्य पालनाचा आनंद असतो ! [ पडदा पडतो. ]

**—: अंक पहिला समाप्त :—**

# [ अंक दुसरा ]



## [ प्रवेश १ ला ]

[ विजयसिंहाचा दीवाणखाना. विजयसिंह, दुर्जनसिंह व आलफखाँ नाचण्यांत दंग झालेले आहेत. नर्तकीचे गाणें चालू आहे. ]

## [ पद ९ वें ]

**हम, सब सुंदर हृदय हरिणी नट - नारी कौशल दरसाते ।**
**हास्य - लास्यसे, हावभावसे चिंता चितकी दूर भगावे ॥ धृ० ॥**
**ताल - ताल संगीत उठे, फिर घनस्वर - जाल गानके छावें ।**
**क्रमसे बनकर शोक - विनीख तान, शून्यमें लय हो जावें ॥ १ ॥**

[ गाणं संपल्यावर नर्तकी मुजरा करते ]

**आलफखाँ :—** चिन्ता चितकी दू....र भगावे । शाब्बास प्यारी. माझ्या मनांतिल सर्व चिंता खरोखरच तूं आज दूर केल्यास. हे घे बक्षिस. [ गळ्यांतील हार काढून फेंकतो. नर्तकी मुजरा करून निघून जाते. आलफखाँ तिच्याकडे बघत रहातो. ]

**विजयसिंह :—** खानसाहेब, कशी काय आहे आमची नर्तकी !

**आलफखाँ :—** बंदा बहोत खूष हूँवा ।

**विजयसिंह :—** बंदा ! खानसाहेब, अशी तेढी बात या सरळ मनाच्या शिपायाला बिलकूल खपणार नाहीं ! तुम्हीं आमचे दोस्त अहांत आतां. [ दुर्जन व आलफखाँ एकमेकांकडे पाहून विजयसिंहास मुजरा करतात. ] बोला, काय म्हणतात बहादुरखाँ ?

**दुर्जनसिंह** :— राणाजींच्या सर्व अटी आम्हांला मान्य आहेत.

**आलफखाँ** :— हाँ महाराणा । वे कह रहे थे कि जिस वंश मे बाप्पाराव समरसिहनें जन्मलिया था अुसी वंशके शेरनें अपने हरे हुये दुष्मन के साथ सन्मानकी अुदारता दिखाअी । धन्य है वह महाराणा ।

**विजयसिंह** :— खानसाहेब, दुष्मनाच्या वीरतेला जातीवंत वीर केव्हांही अभिवादनच करील ! बहाद्दरखाँ खरे वीर आहेत. दोस्त आतां आम्हीं बाहेरची मुलूखगिरी करणार आहोंत.

**दुर्जनसिंह** :— जरूर ! हा दुर्जन राणाजींची प्रत्येक आज्ञा झेलावयास तयार आहे.

**विजयसिंह** :— शाब्बास दुर्जनजी.

**आलफखाँ** :— हाँ महाराणा, आपके शब्द को पुरा करनेमें हमारी तुफान सेना आपकी सहाय्यता करेंगी । यदि, अिन स्वेच्छाचारी जंगली राजाओं को बरबाद करके फिर एक हिंदु साम्राज्य की स्थापना करना हो तो शीर्फ आपकी समशेर ही कर सकेंगी । [ आंत मोगरशिंग वाजते ]

**विजयसिंह** :— [ एकदम उठून ] दादासाहेब ! ............... [ एक सैनिक घाअीघाअीनें प्रवेश करतो ]

**सैनिक** :— [ मुजरा करून ] सरकार, थोरले महाराज इकडेच येत आहेत.

**आलफखाँ** :— राजसिंहजी अेकाअेक यहा क्यौं आगये ? दुर्जनजी —— !

**दुर्जनसिंह** :— हाँ खानसाहेब, दालमें कुछ काला जरूर दिखाइ देता है. राणाजी रायपालनं आपल्या विरूद्ध कांहींतरी मोठंच कारस्थान रचलेलं दिसतय !

**विजयसिंह** :— दुर्जनजी - खानसाहेब, जा लवकर या दरवाज्यानं बाहेर पडा. जारे त्याना वाट दाखव.

**दुर्जनसिंह** :— राणाजी ह्या अवस्थेंत आपणांला सोडून ———

**विजयसिंह** :— माझी तुम्हीं फिकीर करूं नका. [ सैनिकासह दुर्जन-आलफखाँ जातात ] दादासाहेबांचं अचानक येणं, — प्रसंग मोठा बांका आहे. .............. मना शान्त ........ रहा ! [ राजसिंह प्र. क. ] या दादासाहेब ! बसा.

**राजसिंह** :— [ कोचावर बसत ] वा ! तूं तर मोठ्या मजेंत आहेस इथं !

**विजयसिंह** :— पण दादासाहेबांना असं अवचित येण्यांची लहर कशी काय आली ?

**राजसिंह** :— विजय, हा प्रश्न तूं तुझ्या मनाला विचारला असतास तर त्याचं उत्तर ———

**विजयसिंह** :— म्हणजे....! मी नाहीं समजलों आपल्या बोलण्याचा रोख !

**राजसिंह** :— राष्ट्राच्या जीविताला आणि आमच्या ऐक्यतेला धोका निर्माण करताना ———

**विजयसिंह** :— काय बोलता अहांत हें दादासाहेब !

**राजसिंह** :— खरं तेंच बोलतो आहे. विजय, तूं जी करणी करीत आहेस त्यामुळं सबंध राष्ट्राचं जीवित धोक्यांत येणार आहे.

**विजयसिंह** :— मीं आणि ती कशी ?

**राजसिंह** :— करणी करून वर लाज नाहीं वाटत विचारायला ?

**विजयसिंह** :— दादासाहेबांचा कांहींतरी गैरसमज झालेला दिसतो — ! सेनापतिनी दादासाहेबानां, —

**राजसिंह** :— चूप रहा. तुझ्या कर्तृत्वाला वाव दिला त्याचा तूं भलताच फायदा घेत आहेस !

**विजयसिंह :—** शूराला शब्दाचीही चाड असते दादासाहेब !

**राजसिंह :—** तर मग परक्याला अुनाड मैनेप्रमाणं घरठ्यांत घेतांना तुझ्या शूरत्वाची चाड कुठं गेली होती ?

**विजयसिंह :—** संशयाच्या अहारीं जावून मघांपासून आपण मला नाहक छेडीत अहांत !

**राजसिंह :—** विजय, बोल ! दुर्जनसिंहाशीं तुझी मुलाखत झाली कीं नाहीं !

**विजयसिंह :—** होय, झाली !

**राजसिंह :—** बहाद्दरखाँशीं तहाची बोलणीं तूं लावलीस कीं नाहीं ?

**विजयसिंह :—** तहाची बोलणीं ...... ! बहाद्दरखाँच माझ्या पायांशीं नमून मैत्रीची याचना केली आहे त्यानं. आमच्या मान्या अटी त्याला मान्य आहेत.

**राजसिंह :—** विजयसिंहा, अरे शत्रूच्या या करणीनं गृहकलहान्या ठिणग्यांतून निर्माण होणारीं परकियांचीं पिशाच्चें आपल्या राष्ट्रांत अत्याचाराचं तांडवनृत्य करून प्रलयकालाची भीषणता निर्माण करतील हा साधा सुविचारही तुझ्या मनीं कसा रिझला नाहीं ?

**विजयसिंह :—** दादासाहेब, चुकता अहांत तुम्हीं ! प्रलयकालाची भीषणता थोपवून धरण्यांचा हा माझा प्रयत्न आहे. शिवाय शरणांगताला सन्मानतेनं वागविणं हें आम्हां रजपूतांचं ब्रीदच आहे.

**राजसिंह :—** दुराभीमानतेच्या आंधळेपणामुळं तुला कांहींच दिसेनासं झालं आहे.

**विजयसिंह** :— मुळींच नाहीं. शेकडों उज्वल दीपकानीं माझ्या मनांत प्रकाश टाकला आहे,

## [ पद १० वें ]

**जीवन पात्र अमर करते । मोद विकासीं**
**ज्योत प्रकाश । प्रणय वासना विनाशीं ॥ धृ० ॥**
**विन्मुख दृष्टितुनि हटवी संशय ।**
**नजर लाव तू क्षितिजावर । भाव चेतवी,**
**शांत निर्भर । फाकेल तेज घे हातीं मशाल ॥ १ ॥**

स्वातंत्र्याचं उज्वल मंदीर या डोळ्यासमोर तरळत आहे आणि त्याच महत्वाकांक्षेनं सबंध मेवाड ———

**राजसिंह** :— हाच, हाच तुझा आतताईपणा आज आपल्या कार्याची हानी करणारा आहे. अरे, शत्रूनं कितीही चढवलं तरी आपला पाय भक्कम आहे कीं नाहीं हे प्रथम पाहिलं पाहिजे. आज शत्रूच्या कृष्णकारस्थानानीं राज्येंच्या राज्यें धडाधड जळत आहेत. धर्मवीरांचा छळ होत आहे. वाऱ्याप्रमाणं धर्मभ्रष्टता फैलावत असतां याच वेळीं तूला हा बुद्धिभ्रंश कसा झाला ?

**विजयसिंह** :— माझ्या मनावर माझा पूर्ण ताबा आहे दादासाहेब !

**राजसिंह** :— तुझ्या मनावर तुझा ताबा असतां तर दुष्मनांच्या या करामतिचा तुला विसर पडला नसता. आमच्यांत वितुष्ट येवून आमचे बाहू कमजोर होतील आणि कमजोर झालेले बाहू दुष्मनांना चारी मुंड्या चीत करण्यांस असमर्थ ठरतील हें तूं विसरला नसतास !

**विजयसिंह** :— पण दादासाहेब, माझ्या कर्तृत्वाला कलंक लागेल असं माझ्या हातून कांहींच घडलेलं नाहीं. माझं कर्तव्य मी चोख बजावित आहे !

**राजसिंह** :— किती अधःपतन झालं हें तुझं ! आपला देश आणि त्याच्या

गरजांचा तुला विसर पडला, जी प्रजा तुझ्यावर विसंबून आहे, तिचे हाल करण्यांस तूं उद्युक्त झालास———

**विजयसिंह** :— दादासाहेब आपणाला सांगायचं तरी काय ……… माझा अुत्कर्षच जिथं आपणांला सहन होत नसेल ———

**राजसिंह** :— किती कोते विचार घोळताहेत तुझ्या मनांत ! आपल्या देशाचं सौख्यमय जीवन, आणि आताची त्याच्या जीविताची – वित्ताची क्षणभंगूरता, पूर्वीची श्रीमंती, आणि आतांचें त्याचें दारिद्र्य, पूर्वीच्या राण्यांचें प्रजा वात्सल्य आणि आताच्या शत्रूच्या जुलमी अन्यायी वर्तनाचं हृदयस्पर्शी चित्र गुरुदेवांनीं आपल्या हृदयावर रेखाटलं, आपणांला पदोपदीं पढवलं तें कशाकरितां ? महत्वाकांक्षेच्या आहारी जावून अहंकाराला बळी पडण्यांकरितांच कां ?

**विजयसिंह** :— दादासाहेब, माझ्या बुद्धिनं अजून मसणवाट पकडलेली नाहीं, अगर माझ्या बाहूबलाचं सामर्थ्यही कमजोर झालेलं नाहीं.

**राजसिंह** :— पण त्याला मुत्सदीपणाची जोड असेल तरच त्याचा प्रभाव चोहोंकडं फाकला जाअील.

**विजयसिंह** :— माझी जबाबदारी मला पूर्णपणें कळते आहे. माझा सुभा स्वतंत्र आहे दादासाहेब ! ——

**राजसिंह** :— आणि म्हणूनच अेकाद्या दरोडेखोराप्रमाणं ——

**विजयसिंह** :— दादासाहेब, —— !

**राजसिंह** :— [ उठून ] तुझी जबाबदारी तुला कळती तर माझ्या हुकूमाची अमान्यता केली नसतीस. अेका स्वामीभक्ताचा अपमान केला नसतास !

**विजयसिंह** :— स्वामीभक्त ! अपमान !! सेनापतिना माझ्या अीतमामाची दखल असायला पाहिजे होती.

**राजसिंह** :— चूप, तोंड आवर ! तुझा इतमाम फितूरीचा कलंक लागलेला तुझा इतमाम !

**विजयसिंह** :— बस् बस् दादासाहेब नाहीं ऐकवत आतां हें ! युद्धाचं आव्हान देण्यांसाठींच आपण इथं आला असलांत तर ——— ?

**राजसिंह** :— षंढा, या राजसिंहाची समशेर शत्रूच्याच विरुद्ध उपसली जाते !

**विजयसिंह** :— माध्यांतला सोसीकपणा संपला कीं या विजयसिंहाला आपलीही ओळख ——— रहाणार नाहीं दादासाहेब.

**राजसिंह** :— मस्तवाल पोरा, हिताच्या चार गोष्टी सांगून पाहिल्या — , पण नाहीं ... ! फितुरीला जागा ठेवून डोक्यांत राख मात्र घातलीस ! कोण आहे तिकडं — ! [ सेनापति रायपाल पुढं येतो ] सेनापती, या देशघातक्याला कैद करा ——— ! [ सेनापति पुढें होतो ]

**विजयसिंह** :— [ तलवार उपसून ] खबरदार सेनापति ! विजयसिंहाच्या समशेरीवर अजून गंज चढला नाहीं.

**राजसिंह** :— तर मग तिचं तेज मलाही अजमावयाचं आहे ! [ तलवार उपसतो. ]

**विजयसिंह** :— [ बेफाट हंसतो ] दादासाहेब, आपली समशेर फक्त शत्रूच्याच विरुद्ध उपसली जाते हं ! [ पुन्हां हंसतो ] आज आपलं खरं स्वरूप उघड झालं. या बेरडाच्या हातून कैद करण्यापेक्षां खुशाल दादासाहेबांनीच त्यांच्या या शत्रूला कैद करावं ! [ आपली तलवार राजसिंहाचे पायावर टाकतो. ]

— पडदा पडतो —

## [ प्रवेश २ रा ]

[ जंगल, आलफखाँ प्रवेश करतो. ]

**आलफखाँ** :— झक मारली आणि या मोहिमेवर आलों असं झालय्. सुखाचा जीव मात्र या बहाद्दरखाँच्या नादीं लागून दुःखात टाकला. कोण ही जीवाची आटापीट ! अेकादी पोर तरी मिळेल, या आशेनं सारखा घुटमळतोय पण ...... छे ! अजून कुठंच वर्दी लागत नाहीं आमची. नाहीं म्हणायला विजयसिंहाच्या मर्जीतल्या त्या नर्तकीशीं अस्मादिकांचं सूत जमलं असतं खास ! चडपडणाऱ्या या जीवाची अरमान पूरी होईल असं वाटलं होतं पण तिथंही तो काळराहू आमच्या आड आलाच. तिची ती लकब पाहून इष्काच्या प्रेमाचा पारा वर चढतो न चढतो तोंच त्या धूमकेतूच्या आगमनानं तो बर्फापेक्षांही थंडगार झाला. हा इष्काचा रोग काळजाला रोज एक एक घर पाडतोय. तरी आईबापानं दहाव्या वर्षीच शादी केली म्हणून घरांत गोषातली बीबी तरी आली. नाहींतर हा आलफखाँ जन्मभर फक्याच मारीत राहिला असता. बिबी ! मेरे माशूक ! बस् तुझी कसम खाऊन सांगतों कीं, यापुढं मीं परस्त्रिकडं, तिनं माझ्याकडं बघितल्याशिवाय हा आलफखाँ कांहीं तिच्याकडं बघणार नाहीं. माझ्या वस्तादनं मला सांगितलंय् बेटा, दुसऱ्यांच्या बायकांकडं कधींच वाकड्या नजरेनं बघूं नकोस. ते पाप आहे. पाप पुण्याची व्याख्या जाणणाऱ्या माझ्या वस्तादला अवघ्या सात बायका होत्या. दररोज एक एकीकडचं तो बघीत असे आणि त्यामुळं दुसऱ्यांच्या बायका पहाण्याचं पाप त्याच्या हातून झालं नाहीं. बाकी माझा वस्ताद मोठा हुषार होता यांत शंकाच नाहीं. बस् ! ठरलं ! दुसऱ्यांच्या बायकांकडं म्हणून आपण यापुढं बघणार नाहीं. पोरीन कडं मात्र..........आं ? पोरीच नांव काढतांच कुणाची तरी चाहूल अैकूं येवूं लागली. [ कानोसा घेवून ] काय बहार होईल या वेळीं अेकादी पोरं आली तर .... ! अनायासे जंगल आहे. हवा तसा एकांत आहे. सर्व कांहीं अगदीं ठीक जमेल. [ चाहूल जवळ जवळ अैकूं येते ] खरंच ! ह्या जंगली रजपूतांच्या पोरीनपैकींच एकादं चुकारूं पाखरूं तर इकडं येत नसेल नां ? आपण जरा आडोशाला रहावं हेंच बरं ! सावज टप्प्यांत आलं कीं घेतला झेप. [ तिथंच आडोश्याला उभा रहातो ] [ कांहीं वेळानं दुर्जनसिंह प्रवेश करतो. ]

**दुर्जनसिंह :—** घ्या ! ह्या स्वारीला ही खूण सांगून इथं उभं रहायला सांगितलं. पण छे ! [इकडं तिकडं पहात] वेळ मात्र निघून जात आहे.

**आलफखाँ :—** [पुढं येत] [स्वगत] या काफरांच्या जंगलांत गुलाबाचं फूल मिळणं अखेर मुष्कीलच. रानभेंडे मात्र खूप आहेत! [उघड दुर्जनच्या पाठीवर थाप मारून] दोस्त, तुम्ही इकडं येणार अहांत हे मी पार विसरून गेलो होतो माझ्या वस्तादच्या नादांत.

**दुर्जनसिंह :—** बरं बरं! खानसाहेब, चला जल्दी करा. विजयसिंहावर पहारा करीत असलेल्या रायपालाजवळ ह्या वेळीं अवघे दोनच सैनिक आहेत. राजसिंह स्नानाकरितां नुकताच निघून गेलेला आहे. तो परतायच्या आंत आपलं कार्य बिन-भोभाट अुरकलं पाहिजे. चलिये, [जातात]

[सीन ट्रान्सफर. दुसरा पडदा वर अुचलला जातो. स्थळ:- तुरूंग विजयसिंह कैदेत असून अेका शीळेवर लवंडला आहे. अेक पहारेकरी पहारा करीत आहे. दुर्जनसिंह व आलफखाँ दबत दबत प्र. क. दुर्जनसिंह पहारेकऱ्याच्या मस्तकावर मागून फटका मारतो. पहारेकरी मूर्च्छा येवून पडतो. विजयसिंह दचकून उठून उभा रहातो. ]

**विजयसिंह :—** कोण आहे तो?

**दुर्जनसिंह :—** आस्ते राणाजी दुष्मन जाग घेईल. [पहारेकऱ्याच्या कमरेची किल्ली काढतो]

**विजयसिंह :—** सरदार आपण अिथं कशाला आलांत?

**दुर्जनसिंह :—** राणाजीना सोडवण्यांकरितांच!

**विजयसिंह :—** नाहीं! भ्याडासारखा इथून पळून मी तुमच्याबरोबर येणार नाहीं.

**दुर्जनसिंह :—** राणाजी यांत भ्याडपणा नाहीं. दादासाहेबांनी तुम्हांला विश्वासघातानं पकडलं. तुम्हीं कां त्यांच्याशीं विद्रोह केला होतात? साधी ममताही त्यांनीं तुम्हांला दाखवू नये! अेकाद्या दरोडेखोराप्रमाणं त्यांनीं तुमची ही दशा केली;

तुमचें राज्य दुसऱ्याच्या हवालीं केलं! कां? तर तुमचा उत्कर्ष त्यांना सहन झाला नाहीं. राणाजी, सारी मोंगल सेना आपल्या वाटेकडं डोळे लावून बसली आहे. [ किल्लीने दरवाजा अुघडूं लागतो तोंच सेनापति रायपाल प्रवेश करतो. ]

**रायपाल** :— खबरदार नराधमा! राणाजींच्या मध्यस्थिनं त्यावेळीं सुटलास पण आता........ [तलवार उपसतो. दुर्जनसिंह आलफखाँकडं किल्ली फेकतो व तलवार उपसून रायपालावर तुटून पडतो]

**विजयसिंह** :— खानसाहेब, उघडा दरवाजा! [आलफखाँ कुलूप काढायला जातो तोंच दुसरा सैनिक प्र. क.]

**सैनिक** :— ये लांड्या, हा पहा तुझा बाप तुझ्यासमोर हजर आहे. [आलफखाँच्या वारानं सैनिक गतप्राण होतो.]

**आलफखाँ** :— बस्, तेरे पोलादी पत्तेका दिमाख अितनाही था? [दरवाजा उघडतो. विजयसिंह बाहेर येवून खानाच्या हातची तलवार घेतो.]

**विजयसिंह** :— दुर्जनजी, व्हा बाजूला. [ रायपालावर तुटून पडतो. दुर्जन संधि साधून पाठीमागून रायपालावर वार करतो. रायपालाला जबरदस्त जखम होवून तो खालीं पडतो.] दुर्जनजी हें काय केलंत? युद्धनीतिच्या विरूद्ध—

**दुर्जनसिंह** :— महाराज, त्याचा विचार मग करूं! पण आपण आधी चला. [त्याला ओढीतच नेतो. सर्वजण जातात.]

**रायपाल** :— [उठून] आज माझ्या आयुष्याची सफलता झाली. परमेश्वरा, धन्याच्या सेवेसाठीं हा प्राण मी अर्पण करतो आहे. बा मेवाडा! स्वातंत्र्याच्या अुज्वल प्रभेनं सुशोभीत झालेलं तुझं दर्शन घेण्याची अिच्छा अपूरी राहिली ती पूर्ण करण्यांकरितां फिरून माझ्या मेवाडांतच मला जन्माला घाल अशी श्री अेकलिंगजी-पाशीं प्रार्थना करीन. सलोक्ता, अैक्यता, स्वकर्मजीत अशा उत्तम गुणांनी माझा देश संपन्न होवो! रजपूतांच्या या भूमींत चैतन्याचा, सामर्थ्याचा संचार होवो! [मृतसैनिकांना उद्देशून] रणबहाद्दरानों, तुमचं अिमान तुमच्या स्वामीभक्तिनं कायम राखलं. ते पहा, ते......पहा; तुमचे स्वर्गस्थ पुण्यात्मे तुमचं स्वागत

करण्यांकरितां स्वर्गाच्या दारीं उभे आहेत! अैका! अैका!! स्वर्गीं तुमच्या अिमानाच्या नौबती झडूं लागल्या. महाराज, माझा आत्मा इच्छाबलांच्या अक्षौहीणी बरोबर घेवून आज स्वर्गलोकीं जात आहे. महाराज, राजसिंह महाराज या स्वामीभक्त सेवकाचा हा अखेरचा प्रणाम.......! [मुजरा करीत असतानांच घेरी येवून पडतो.] ज....य स्व-दे-श! ज....य, मे.......मे........ वाड.......! [प्राण सोडतो.]

— पडदा पडतो —

---

## प्रवेश ३ रा

[बाग: विजया चंद्राकडं पहात आहे. तिच्या मुद्रेवर उदासीनता दिसत आहे. कांहीं वेळानें कसला तरी निश्चय करून ती बोलूं लागते.]

**विजया :—** आकाशाच्या निर्मल अंकावर निर्मलपणानं विहार करणारा तूं चंद्रमा ना? तूं प्रेमपूर्तीचं मांगल्य स्थान! अुदार मनाचा तूं! आज माझं दुःख पाहून अितक्या खुशींत कां बरं तूं? सर्व मेवाड आज रडत आहे; चोहोंकडं हाहाःकार अुडून दशदिशा हादरून गेल्या आहेत. मेवाडची वसुंधरा रक्तलांच्छित झाली आहे आणि तूं हें सर्व पाहून हंसत आहेस! माझा सौभाग्य चंद्रमा आज मोंगलांच्या छावणींत आहे म्हणून तर तूं त्याची अवहेलना करीत नाहींस ना? देशद्रोह्याच्या पापानं माझा चंद्रमा कलंकित झाला म्हणून तर तूं त्याला हंसत नाहींस ना? [उठून] तूं ही लांच्छित चंद्रमा आहेस! गुरूपत्नीशीं व्यभिचार केलास म्हणून तर तुलाही वर्षाकालीं डोळ्यांवर पदर घेवून रडावं लागतं! पण..... तुला तरी दोष मी कां द्यावा? आजचा कालच असा आहे; आपलेपणाची जाणीव नामशेष करून वीणेचे झंकार आणि पखवाजांचे बोल, परींच्या छुम-छुम् नाचांत नेत्र कटाक्षांनीं घायाळ होण्यांतच वीर वरांची शक्ती खर्ची पडत आहे. परकियांच्या लाथा पदोपदीं अंगाखांद्यावर खेळत असतां, भाअीबंदांचा, आयाबहीणींचा टाहो

फोडून आक्रोश चालला असतां, स्वत:च्या अैहिक सुखांत आज माझा चंद्रमा रमराण झाला आहे. विजयसिंह महाराज, आपण कोण, आपला दर्जा काय, आपली इभ्रत केवढी, आपला दरारा किती! हें सर्व कांहीं विसरून; विलासासांठीं हपापलेल्या जीवांची चंगल अुडविण्यांत दुष्मनांच्या पायपोसाशीं लोळण घेतलीत! किती, किती लाजीरवाणी कृति केलीत ही........! [राणी रंजना विजयेचा शोध करीत येतें. विजयेचं तिच्याकडं लक्ष नसतं.] पोकळ अभिमानाच्या धुंदींत आत्मघात करायला लाज वाटली नाहीं तुम्हांला? राजकारणांच्या अभावामुळं, गैर समजाच्या दुहीमुळं परकियांच्या तलवारींखालीं अगदीं अेकाद्या आततायी माणसां-प्रमाणं मान वांकविलीत! भाईला रात्रंदिवस राष्ट्राची काळजी वहाणाऱ्या त्या सत्पुरुषाला निराश करून, त्याची उमेद खची केलीत. धर्मवीरांचा अुच्छेद मांडलांत! रायपालजीच्या रक्तानं हात विटाळलेत! किती किती अघोरी............ कसाब करणीं केलींत ही! रानावनांचा आश्रय घेवून विपत्तींत प्राणाच्या पलिकडंही तुमचं पालन करणाऱ्या गुरुदेवांचीही तुम्हांला विस्मृति पडली. महाराज, काय केलंत हें..........! ह्याच साठीं का, हेंच अैकण्यांसाठींच कां माझ्या मनीं प्रीतीची ज्योत पेटविलीत! [तोल जावून पडणार तोंच राणी रंजना पुढें होवून तिला सावरते ]

**रंजना** :— विजये, हें काय असं वेड्यासारखं बरं? माणसानं मन कसं नेहमीं खंबीर ठेवावं.

**विजया** :— देवी, मला वेड लागलं असतं तर बरं झालं असतं पण हा दैवाचा दुर्विलास आतां मला सहन नाहीं होत!

**रंजना** :— खुळी कुठची! सभोंवार काळाची गर्जना चालली आहे. अवेळीं अशुभ धुत्कार अैकूं येत आहेत! पण त्यानं खच्चून न जातां अिडरच्या चक्रव्यूहांत बेभानपणं कोंडल्या गेलेल्या भाउजींना शुद्धिवर कसं आणतां येईल याचा विचार करायचा कीं, असं हताष होवून मुळूमुळू रडत बसायचं?

**विजया** :— देवी, रडण्यांशिवाय ही अबला दुसरं काय करणार?

**रंजना** :— अबला! तूं, विजये तूं अबला?

## [ पद ११ वें ]

तूं आर्ये वीरांगना, कां म्हणविशी अबला ॥ धृ० ॥
नच तोड तिला त्या समर प्रसंगी ।
चमकत वेगें ती शौर्य भामिनी ।
दावूनी अपूला हात रिपूला । सकल योद्धे,
समर्यी दिपती ती धन्य माता तूझी ।
आर्य वीरांगना ॥ १ ॥

राणी मंगलादेवीची कन्या अबला?

**विजया :—** देवी, देवी कशाला ती गतकालची आठवण काढलीस ह्यावेळीं?

**रंजना :—** आपत्तिला न भीतां, काळाच्या कराल मिठींतून ह्या वीरांगनेनं सहीसलामत बाहेर पडावं म्हणून! विजये, तुझ्या जागीं मी असते तर वाटेल त्या उपायानं राणाजींची अिडरला जावून भेट घेतली असती — [राजसिंह प्र. क.]

**राजसिंह :—** [विजयेकडे लक्ष जावून] विजये फिरून तूं अशी उदास! [तिला जवळ घेतात] वेडे, असं भावनावश होवून कसं चालेल? तुझा विजय आतां तुझा राहिला नाहीं. आज घडीला त्याला तुझंहि विस्मरण पडलं आहे.

**विजया:—** भाअी, जातीचा शूर शिपाअी आततायी असतो. मग दोन हातीं समशेरी पेलणारा माझा गडी मुत्सदी कसा बरं असेल?

**राजसिंह :—** विजये, परिस्थितिची जाणीव करून दिल्यानंतरही अविवेकानं वागणं कितपत रास्त होईल?

**विजया :—** सरळ मनाच्या रांगड्या गड्याला परिस्थितिची जाणीव अेकाअेकी होत नसते? तो सूर्य आणि हा जयंद्रथ दाखवूनच त्याचा कायापालट करायला हवा. भाअी, वज्रासारखं कठोर मन करून तूं त्यांना ———

**राजसिंह :—** विजये ———!

**विजया :—** भाअी, जिला अंगाखांद्यावर खेळवलीस, जिचं तासन्तास कोडकौतूक केलंस, रानावनांतून भटकतांना पायाला काटे लागतील म्हणून जिला

हातांवर झेलून वाहून नेलंस, दुःखाची तिरपी झळही जिच्या छायेला शिवूं दिली नाहींस तो हा माझा भाअी आजच माझ्यावर अितका निष्ठूर कसा झाला ?

**राजसिंह** :— [स्वगत] ह्या निष्पाप जीवाला आतां कसं समजावूं? हिचं शान्तवन तरी मी कसं करूं? खरंच! माझं तर कांहीं चुकलं नाहीं नां? गुरुदेव! गुरुदेव!! [उघड] विजये, घाबरूं नकोस. तुझा विजय तुला लवकरच परत मिळेल. [ निघून जातो ]

**विजया** :— भाअी ———, माझ्या भाअीला मी दुखवलं. त्याच्या मनाला मी लागेल असं बोलले! देवी, क्षमा कर या वेडीला! [ तिला बिलगते ]

**रंजना** :— विजये, त्यांचा आशीर्वाद खात्रीनं फळाला येईल. जा, बेटा, स्वस्थ पड जा आतां. भवितव्यता जशी असेल तसंच होअिल!

**विजया** :— [ तिचे पाय धरून ] देवी, राष्ट्रकार्याकरितां स्वतःचं बलिदान देण्याचं सामर्थ्य प्राप्त होवो असा आशीर्वाद द्या!

**रंजना** :— आर्यवीरांगना हो! [ राणी रंजना जाते ]

**विजया** :— [ तिच्या पायाची धूळ मस्तकाला लावते. अुठून ] आतां ही विजया अबला राहिलेली नाहीं!———

## [ पद १२ वें ]

**बहरला वसन्त परिसरांत। तरंग अुठले मम मनांत।**
**फुललें मन अभिमानें ॥ धृ० ॥ मरणाच्या आसपास।**
**चंदनाचा तो सुवास। ध्येयाचें जीवनांमृत। त्वां पाजीयेलें, ॥ १ ॥**

मुळूमुळू रडत बसणारी विजया आज मेली. भाईचा आशीर्वाद, आणि देवीच्या उपदेशानं जीवनामृत मिळालेल्या ह्या विजयेचा आपलं साध्य साधण्यांसाठीं आज पुनर्जन्म झाला. [ जाते ]

— पडदा पडतो —

## [ प्रवेश ४ था ]

[ ओडरच्या छावणींतिल एक आडवाट. मोंगल सेनापति बहाद्दरखाँ व दुर्जनसिंह बोलत प्रवेश करतात. ]

**बहाद्दरखाँ** :— दुर्जनजी, आपके बहाद्दुरीपर हम बहोत खूष हैं ! आपने बडी कुशलतासे राणाजीको यहाँ लाया, और सम्राट के सिंहासनकी रक्षा की। [ दुर्जन आदबीने कुर्निसात करतो. ] नहीं, नहीं, दुर्जनजी आपको हम कुर्निसात करते हैं ! [ कुर्निसात करतो. ]

**दुर्जनसिंह** :— हुजूर, जबरदस्त महत्वाकांक्षा आणि धडाडी असल्यावर आपणाला अशक्य असं काय आहे ? प्रत्यक्ष परमेश्वरही नमतो तिथं ———

**बहाद्दरखाँ** :— बिलकूल ठीक ! दुर्जनजी, अभी मैनें अेक अच्छी शक्कल निकल दी है, कि ——, विजयसिंह मेवाड के सम्राट हैं, और हम उनकी आज्ञा का पालन करना यह हमारा फर्ज समजता है। उसी आज्ञासे फिर हम जंग की तयारी कर रहे हैं। अैसी पुकार लोगोंमे जाहीर होने दो। क्या, आप मेरा मतलब समझ गये नं ?

**दुर्जनसिंह** :— आलं लक्षांत ! म्हणजे —— मंगलगडचा सारा रजपूत आपणाला मिळेल. मोठी नामी शक्कल आहे हुजूरांची !

**बहाद्दरखाँ** :— हाँ, और आप अुस काफर को यहाँ नजरकैद करके रख दो ! मैं फिर पवनगड घेर लूंगा ? क्यों ?

**दुर्जनसिंह** :— आज्ञा हुजूर. विजयसिंह आपल्या आश्रयाला आल्या कारणानं राजसिंह तिकडे सैन्याची जमवाजमव करीत असेल. अचानक पवनगड घेरल्यामुळं त्याची चांगलीच नाकेबंदी होईल. मूर्ख चंचल विजयसिंहाला मी इकडं चांगलाच रमवतो. अेक बडा पाहूणा, रजपूतांचा सम्राट म्हणून त्याची बडदास्त ठेवतो. परींच्या नांच गाण्यानीं तो पागल बेहोष होवून चाललाच आहे. त्याला पूरा पागल करतो.

**बहाद्दरखाँ** :— शाब्बास ! अैसाही होना चाहिये. सुल्तानका तख्त

हिलानेवाले ये सैतान काफरको यह बहाद्दरखाँ, अभी पूरा खतम कर देगा।

**दुर्जनसिंह :—** दोन्हीं बाजूनीं पेटलेल्या लांकडांतील किड्याप्रमाणं हे हरामखोर तडफडून मेले पाहिजेत. हुजूर, आपली फत्ते तिच माझी फत्ते! माझ्या अपमानाचा बदला उगवून ती घमेंडखोर.......रंजना ——,

**बहाद्दरखाँ :—** आपको जरूर मिलेंगी। देखो, आप और आलफ यह काम होशियारीसे कर लेना अगर गफलत हो जायगी तो सारा जमाना उलटा हो जायगा।

**दुर्जनसिंह :—** काय बिशाद आहे गाफिलगीरीची! अगदीं पक्का बंदोबस्त करतो त्या हरामखोराचा. आपल्या हेतूचा थांगपत्ताही लागू देणार नाहीं त्याला!

**बहाद्दरखाँ :—** अच्छी बात है। कल सबेरे हम सेना लेकर पवनगड घेर लेंगे। सुलतानकी रसद आते ही आप पवनगड चले आना।

**दुर्जनसिंह :—** जी हुजूर! [ कुर्निसात करतो. बहाद्दरखाँ जातो. ] असूडाचे फटकारे अुडवून हरिहरानं भर दरबारीं माझी मानखंडणा केली होती. रंजनेचं नखही तुझ्या नजरेस पडणार नाहीं असं मोठ्या आढ्यतेनं तो घमेंडखोर म्हातारा बरळला होता. भीमदेवाची अवलाद फितूर म्हणून त्यावेळीं चाबकाच्या फटकाऱ्यानीं माझी पाठ सोललीस; असूडाच्या फटकाऱ्यानीं झालेली जखम नाहींशीही झाली. पण या दुर्जनच्या स्वाभिमानाला तिनं तेवत ठेवलं! अपमान मानहानीनं मी त्या वेळीं कालवंडलो होतों, गतायुष्यांतिल त्या आठवणीनं उचल खाल्ली, त्यावेळचा तो प्रसंग, त्या घमेंडखोर पोरीची ती कुत्सीत नजर डोळ्यां-समोर तरळूं लागली कीं अंगाचा कसा तिळपापड होतो. मेंदू मसणवाट पकडतो! रंजने —! रंजने तुला या पायाशीं खेंचून तुझ्या त्या कोमल कायेची अशी गत केल्याशिवाय [ हातांतील फुल कुस्करून फेकून देतो ] माझ्या अंतःकरणाची ही धगधगती आग कधींही शमणार नाहीं! [ त्वेषानं निघून जातो. ]



## [ प्रवेश ५ वा ]

[ स्थळ:- गुरुदेवांचा मठ. गुरुदेव ध्यानस्त बसलेले आहेत. त्यांच्या पुढ्यांत श्री चंडिकेश्वराची मूर्ती आहे. कांहीं वेळानं गुरुदेवांची समाधी उतरते.]

**सिद्धराज :—** जय श्री अेकलिंगजी! जय श्री चंडिकेश्वर!! प्रभो, किती आतां अंत पहाणार आहेस? अेकवार भारतवर्षाकडं जरा पहा. विक्रीला काढलेल्या गुलामाप्रमाणं त्याची स्थिती झाली आहे. पठाण–तूर्क किती दूरचे! पण त्यांनीं धडक्यांनीं आमचा हा पवित्र देश पायांखालीं घातला. आमच्या आया - बहिणींची अनन्वीत विटंबना केली. आमचा उदार राजनवर्ग भयंकर निर्दयतेनं ठार मारला. आमची संपत्ति लुटून स्वतःचा देश संपन्न केला. पहा, हे प्रभो! आमची घरंदारं कशी पेटत आहेत! देवांचा आणि देवालयांचा विध्वंस होत आहे. आर्यललनांच्या केविलवाण्या किंकाळ्या कानाकोपऱ्यांतून बाहेर पडत आहेत. प्रभो, ह्या सर्वांचं निरिक्षण करून आपल्या ह्या पाषाण हृदयाला पाझर फूटूं द्या! जय श्री अेकलिंगजी! जय श्री चंडिकेश्वरा!! [ वंदन करतात. दूरवर घोड्याच्या टापा अैकूं येतात. कानोसा घेवून ] कोण बरं येत आहे अशावेळीं? [ ओळखून ] हें काय? हा असा चिंताग्रस्त कां दिसत आहे! ज्याच्या मुखावरचं तेज पहातांच कळीकाळालाही शरम वाटावी, ज्याच्या मुखावरिल हास्य पाहून या बैराग्यालाही हेवा वाटावा, तो माझा बेटा आज असा मलूल कां बरं दिसत आहे! जय श्री चंडिकेश्वर! [ राजसिंह प्रवेश करून वंदन करतो ] वत्सा! तुझ्यासारख्या जबाबदार व्यक्तिनं आतां असं अेकटं दुकटं फिरणं बरं नव्हे! पण तूं असा चिंतातूर कां? [ राजसिंह गप्पच रहातो ] विजयसिंह कुठं आहे? सर्व कुशल आहे ना? —

**राजसिंह :—** [ खाली मान घालून ] विजय अीडरला ........आहे!

**सिद्धराज :—** म्हणजे — ?

**राजसिंह :—** गुरुदेव तो दुष्मनांना जावून मिळाला.

**सिद्धराज :—** काय तो मोंगलांना मिळाला? स्वत:च्या भावाविरुद्ध स्वतःच्या राष्ट्राविरुद्ध तलवार उचलण्यांसाठीं तो परकियांना मिळाला? विजय अितका नीच होअील असं मला तरी वाटलं नव्हतं!

**राजसिंह** :— असं होण्याला मीच कारण झालों गुरुदेव. त्याचं राज्य मी काढून घेतल्यामुळंच तो परकियांना जावून मिळाला.

**सिद्धराज** :— त्यांत तुझा दोष नाहीं! तूं केलंस तें सर्व योग्यच होतं. राजा, विजयसिंहासारखें क्षुद्र मनोवृत्तीचें लोक अहंकाराला बळी पडले म्हणजे विभक्त राज्यपद्धतीनें देश विभक्त होतो. देश विभक्त झाला कीं, त्याला दुबळेपणा प्राप्त होतो. साम्राज्यांत शत्रू निर्माण होतात आणि दुष्मनांना आपली करामत गाजवायला पूर्णपणें वाव मिळतो. विभक्त राज्यपद्धतीनं परशत्रूंचें हल्ले परतविणं मुष्कीलीचं होतं!

**राजसिंह** :— गुरुदेव, मी राजसंन्यास घेवून राष्ट्राची सेवा करीन पण अधिकार आणि वैभवच जर त्याला पाहिजे असेल ———

**सिद्धराज** :— राजसिंहा, अेकछत्री राज्याचा अधिश्वर होण्यास तूंच योग्य आहेस. तुला वैभव, अधिकार आणि राजनीतिज्ञतेची जबाबदारी सांभाळणं भाग आहे. तें तुझं कर्तव्यच आहे.

**राजसिंह** :— भावाच्या विरुद्ध शस्त्र उपसणं ———,

**सिद्धराज** :— वेड्या, काय बोलतो आहेस—! अरे त्यानं तुझ्यावर शस्त्र अुपसलं?

**राजसिंह** :— तो आततायी आहे, लहान आहे, गुरुदेव!

**सिद्धराज** :— [ हंसून ] आणि तूं मात्र मोठा शहाणा आहेस, असंच ना? राजसिंहा, राष्ट्राची जबाबदारी तुला कळती तर तिच्यापुढं तुला बंधुप्रेमाची मातब्बरी अधिक वाटली नसती! लक्षावधी प्रजेच्या सुखदु:खाचा विचार तुझ्या मनीं येता तर भावाच्या प्रेमानं अंध होवून भावनावश झाला नसतास! राजा, वैयाक्तिक स्वार्थानं जर तूं अितका अंध होत आहेस तर आपल्या महान देशव्रताला मूठमाती दे! मुसलमानांच्या चरण तीर्थावर तें समर्पण कर. प्रजेच्या हिताची आणि राष्ट्राच्या स्वातंत्र्याची काळजी सोडून मायभूमीच्या गळ्यांत परदास्याच्या गुलामीची बेडी अडकवून मोकळा हो! म्हणजे भावाचे लाड पुरविण्यांस तुला भरपूर अवसर मिळेल.

**राजसिंह** :— नाहीं, त्रिवार नाहीं! देहांत प्राण असेपर्यंत माझी मायभूमी मी परकीयांचे हातीं लागूं देणार नाहीं.

**सिद्धराज** :— होय ना! मग अिथं आलास तरी कशाला?

**राजसिंह** :— अेकवार — ओडरला जावून विजयसिंहाची भेट घेअीन म्हणतो ——!

**सिद्धराज** :— तूं ओडरला जाणार? नाहीं! राजा, हें राजदंडाच्या नियमाला सोडून आहे. व्यक्तिला सांभाळणं हा कांहीं राजधर्म नव्हे! शुद्ध अविचार आहे! विजय तुझा शत्रू नसून, तो देशाचा शत्रू आहे. तूं अेकव्या पुरता केव्हांहीं विचार करता कामा नयेस!

**राजसिंह** :— गुरुदेव, देशाचा शत्रू मुळींच नाहीं —! मला शासन करण्यां-करितांच तो माझा शत्रू झाला आहे.

**सिद्धराज** :— मग हें जर तुला पटतं, तर मग बंधु-प्रेमांत गुरफटून तूं देशाचा बळी कां देत आहेस? देशाचा बळी देण्याचा तुला काय अधिकार?

**राजसिंह** :— स्वप्नांतही हा राजसिंह तशी अिच्छा करणार नाहीं. गुरुदेव, भावाचं काय, पण देशापुढं मी आपलीही किंमत करणार नाहीं! माझा देश हाच माझा प्राण आणि तेंच माझें जीवन. म्हणूनच म्हणतों असल्या या भांडणांत देशाचा आणि प्रजेचा घात करण्यांपेक्षां हें राज्यच विजयाच्या स्वाधीन करून सगळं भांडणच मिटवून टाकतो.

**सिद्धराज** :— वत्सा, चुकतो आहेस तूं। अेवढ्या मोठ्या जबाबदारींतून सहीसलामत पार पडण्यांचं सामर्थ्य विजयसिंहांत खास नाहीं. कोणाच्या हातीं किती सामर्थ्य आहे हें मी पूरे जाणून आहे.

**राजसिंह** :— माझ्यापेक्षांही तो पराक्रमी आहे. राज्यसंवर्धनाला त्याच्या पराक्रमाची जोड मिळाली ———

**सिद्धराज** :— अरे, नुसतं बाहुबल काय कामाचं? भीम सामर्थ्याला धर्माचं हृदय आणि अर्जुनाचं अचूक शरसंधान पाहिजे. अंतःकरणपूर्वक रयतेचं प्रेम संपादन केल्याशिवाय, रयतेला पोराप्रमाणं वागविल्याशिवाय, रयता सुखी होत

नाहीं. रयता सुखी तर राज्यांत अेकी आणि सामर्थ्य यांची जोडी नांदून राष्ट्राला सूसंघटीतपणा प्राप्त होतो. तुझ्याकडं जें आहे, तेंच नेमकं विजयसिंहांत नाहीं. त्याला देशाबद्दल प्रेम वाटलं असतं तर तो भावाविरुद्ध अुलटला नसता. निदान शत्रूला तरी मिळाला नसता. वत्सा, संसार हाच प्रेमळपणा, आपलेपणा शिकण्याची जागा आहे. ज्याचं आपल्या माणसावर प्रेम नाहीं, ज्याला आपल्या रक्ताचा अभिमान नाहीं तो देशावर कितीसा प्रेम करणार? प्रेम हें स्वाभाविक असतं! शिकवून ते कुणाला येत नाहीं! जा बेटा, कपटी बहाद्दरखाँ कदाचित फिरून गड घेण्यांच्या तयारींत असणं संभव आहे. जय्यत तयारींत रहा. प्रजेची आणि राष्ट्राची सेवा यथाशक्ति केल्यावर स्वजनांसाठीं व्यर्थ चिंता करीत हृदय जाळण्यांअैवजीं हृदयांत कर्तव्याचं स्मरण दृढ करण्यांचा प्रयत्न करणं हेंच आम्हां आर्यांचं द्योतक आहे. "भावनेपेक्षां कर्तव्य श्रेष्ठ आहे."! जय श्री अेकलिंगजी! जय श्री चंडिकेश्वर!! [ प्रणाम करतात. राजसिंह प्रणाम करतो. — ]

[ पडदा पडतो ]

## —: अंक दुसरा समाप्त :—



# [ अंक तिसरा ]



## [ प्रवेश १ ला ]

[ स्थळ:- मोंगल छावणीच्या वेशीं बाहेरील अेक वाट. गुरुदेव सिद्धराज फकिराच्या वेषांत प्रवेश करतात. ]

**सिद्धराज** :— दुर्जनसिंहाचे परवानगीवांचून कुणाचाही छावणींत प्रवेश होत नाहीं. हिंदूना तर सक्त मज्जाव आहे. राजसिंहाकडून कुणीतरी गुप्त हेर येअील म्हणून कीं, काय त्यानं किती खबरदारी घेतली आहे! शहरासारखं शहर पण त्याला आज चौफेर तटबंदी केल्यानं कारागृहाचं स्वरुप प्राप्त झालं आहे. विजयसिंहाच्या भेटीसाठीं आलों पण ... सभोंवार ही असलेली तटबंदी —— [ आंतमध्यें गाण्यांचा आवाज अैकूं येतो. नर्तकीच्या वेषांत विजया गांत गांत प्रवेश करते. ]

### [ पद १३ वें ]

**मेरी आँखे दुंडकर कहती हैं, स्वाभिमानसे भरा दील तेरा**
**अब कहां भूलकर बैठा।**
**मैंनें प्यारसे अुसे हृदयमें बझाया, लेकिन क्यों अुन्होनें**
**अपने पनभी गवाँ दिया ॥**

**सिद्धराज** :— [ स्वगत ] माझ्या प्रमाणंच ही सुद्धां कुणाच्या तरी शोधांत दिसत आहे खास!

**विजया** :— [ लक्ष जावून ] अे, तुम कौन हो जी —?

**सिद्धराज** :— [ दचकून ] आँ! हा आवाज तर — [ विजयेला पाहून तिला ओळखतात ] अस्सं!

**विजया** :— अे, तुला अैकूं येतं कीं नाहीं? तूं इथं काय करित आहेस? कशाला आलास इथं?

**सिद्धराज** :— बेटी, भिवूं नकोस. मी अेक निरुपद्रवी फकिर आहे. पोटासाठीं कांहींतरी मिळेल या आशेनं आलों आहे.

**विजया** :— तर मग तुझी अिथं निराशाच होणार आहे. अरे ही दुर्जनसिंहाची छावणी आहे आणि त्याच्या परवानगीवांचून आंत कुणालाच जातां येत नाहीं. आलास तसा बाबा माघारी फिर जा!

**सिद्धराज** :— बेटी तुझ्याकडून तरी कांहीं मिळेल का या फकिराला?

**विजया** :— माझ्याकडून ——! [ हंसते ] बरं हे घे तर. [ आपल्या जवळची अेक मोहोर काढून देते.]

**सिद्धराज** :— अल्ला तुझं भलं करो! बेटी, तुझ्या चर्येवरून तूं दुःखी असावीस असं मला वाटतं! खरं नां?

**विजया** :— हे तूं कशावरून ताडलंस? [ गुरुदेव हंसतात ] अे बुढ्या, अरे तुला हंसायला काय झालं?

**सिद्धराज** :— अल्लाच्या करामतीकडं पाहून कोण हंसणार नाहीं? [ तिच्याकडं पाहूं लागतात ]

**विजया** :— [ स्वगत ] हा तर माझं निरिक्षण करतो आहे म्हणायचं!

**सिद्धराज** :— बेटी, भिवूं नकोस! सर्व संग परित्याग केलेल्या या फकिराकडून तुला बिलकूल त्रास होणार नाहीं.

**विजया** :— तूं अिथून निमूटपणं जा कसा—? पूरे झाली ही तुझी बडबड.

**सिद्धराज** :— बेटी, तुझ्यासारख्या रूपयौवनेनं आजच्या परिस्थितींत असं अेकटं फिरणं बरं नव्हे!

**विजया** :— त्याची नको तुला काळजी! माझी मी समर्थ आहे. [ विजया जावूं लागते. ]

**सिद्धराज :—** [ तिला अडवून ] बेटी, माझ्या प्रश्नाचं उत्तर नाहीं दिलंस?

**विजया :—** मोठाच लोचट दिसतोस तूं! कुठला तुझा प्रश्न?

**सिध्द्राज :—** तूं दु:खी आहेस हें खरं ना?

**विजया :—** माझ्या दु:खाशीं तुला रे काय करायचं आहे?

**सिध्द्राज :—** तूं अिथं कशाला आलीस, तुझ्या मनांत काय काय विचार घोळताहेत हे मी जाणतो!

**विजया :—** [ स्वगत ] माझ्या पाळतीवर असलेला हा कोणी हेर तर नाहीं ना?

**सिध्द्राज :—** बनावट सजावट करून तूं कुणाच्या तरी — शोधांत आहेस खरं ना?

**विजया :—** साफ खोटं? [ हंसून ] अरे मी मूळचीच या शहरांतली आहे. ही माझी जन्मभूमी! लहानाची मोठी मी इथंच झाले—

**सिध्द्राज :—** बेटी, माझं रमल कधींच खोटं होत नाहीं! तूं मला फसवशील पण स्वत:च्या मनाला कसं फसवशील —?

**विजया :—** बंद कर तुझी ही वटवट! चल—, सोड माझी वाट निमूटपणं.

**सिध्द्राज :—** जाशील, पण — तुझं दुसरंही गुपीत सांगतो — तूं अिथली खास नाहींस. पवनगडावरून आलेली आहेस आणि दुर्जनच्या छावणींत पडलेल्या अेका रजपूत राजाला भेटण्यांची तुला अनावर उत्कंठा लागलेली आहे. [ विजया दचकते ] दचकूं नकोस! तुझं खरं स्वरूप अुघड झालं ना? बेटा, घाबरूं नकोस! माझ्याकडून तुला काडीचाही अुपद्रव होणार नाहीं. लागल्यास मी तुला सहाय्यच करीन.

**विजया :—** अल्लाला स्मरून सांगतोस?

**सिध्द्राज :—** बेटा, परोपकार करण्यांत सारी उमर खर्ची घातली आणि अशावेळीं माझ्या विजयेला मी सहाय्य करणार नाहीं तर कुणाला?

**विजया :—** [ आश्चर्यानें ] कोण......? बाबा! [ त्यांच्या कुशींत शिरते ]

बाबा, अविचारानं मी कांहींतरीच बोललें आपणाला! क्षमा करा मला! [पाय धरते]

**सिध्दराज** :— [तिला उठवून] माझ्या बालेवर मी कधींतरी रागावेन कां? बेटा, या साहसी कर्तृत्वानं आज तूं मला चकीत केलंस. खरी वीरपुत्री शोभतेस! ध्येयानं प्रेरीत झालेलीं तुझ्यासारखीं रत्नें ज्या राष्ट्रांत निर्माण होतात, त्या राष्ट्राचा उदयकाल अगदीं समीप असतो! "जय श्री अेकलिंगजी" तुझी लीला किती अगाध आहे!

**विजया** :— किती विचित्र योगायोग हा! बाबा, मी तुमच्या सानिध्यांत राहूनही तुम्हांला ओळखूं शकले नाहीं! ह्या वेषांत आपण अिकडं कसे बरं —?

**सिध्दराज** :— तूं जे साध्य करण्याच्या ईराद्यानं अिथं आलीस त्याच ईराद्यानं हा सिद्धराजही फकीर बनून अिथं आला आहे.

**विजया** :— [स्वगत - पण मोठ्यानं] श्री अेकलिंगजीची कृपा म्हणूनच माझे बाबा या वेळीं माझ्या सहाय्याला धावून आले.

**सिध्दराज** :— बेटी अिच्छा असली कीं मार्ग सांपडतोच! [पडद्याच्या आंत – आलफखाँ व अेक मोंगल सैनिक तटबंदीची पहाणी करीत आहेत. तिकडं लक्ष जावून] बेटा कोणीतरी मोंगल सरदार तटबंदीची पहाणीं करीत आहे.

**विजया** :— थांबा तर बाबा, त्यांचं आपणाकडे लक्ष वेधवूं या. [गाण्याला सुरवात करते.]

## [पद १४ वें]

**क्यौं अितना है चंद्र मनोहर - रूप उसकि पाया है।**

[आलफखाँ व कासम नाव धारण केलेला धवलराय प्रवेश करतात]

**क्यौं अितना रंगीन कमल है? – उसीका रंगही चुराया है॥ धृ०॥**

**आलफखाँ** :— वाँ! मैं इतना खुबसूरत हो कर भी मुझे अभितक पता भी नहीं था!

**विजया :**— [ विजया गातच असते ]

**मैं करती हूँ प्यार हृदयमें, मनमें वहीं समाया है।**

**आलफखाँ :**— वां! वां! ये आलफखाँ तुम्हारे मनमें? वह्व्वाँ! शाब्बास प्यारी!!

**विजया :**— [ विजया गातच असते ]

**क्यौं अितना है चंद्र मनोहर - रूप उसीका पाया है ॥ १ ॥**

**आलफखाँ :**— [ स्वगत ] माशाल्ला! क्या कहा? वह, तो मेरे लिये पागलहि बनगयी! [ उघड ] प्यारी, — मनुष्य लोगका संगीत स्वर्गके संगीत को भी पीछे हटा देता है यह तुमने अभि अभि दिखा दिया! [ विजया कुर्निसात करते. आलफखाँ कासमला उद्देशून ] गद्धा कहीं का! देख क्या रहा है —? पूछ ले उसे, वह कौन है......! [ कासमचें त्याकडं लक्ष नसतं. तो आपल्याच तंद्रीत सिद्धराजांचं बारकाईनं निरिक्षण करीत असतो. ]

**कासम :**— [ स्वगत ] ओळखलं! खास प्रभुराजच हे आणि ही विजयाताई!

**आलफखाँ :**— अबे, पगले के माफक देख क्या रहा है! सुना नहीं? पूछ ले उसे वह कौन है!

**कासम :**— [ भानावर येवून ] अच्छा हुजूर! अै, तुम कौन हो! यहाँ तूं क्या करती है? यहाँ किधरसे आयी? क्यौं आयी!

**आलफखाँ :**— अबे पागल, जरा आस्ते, आस्ते पूछो। नहीं तो वह घबडा जायेगी। देख [ सावकाश सांगतो ] अैसा पूछ — मेरे गुलनार नारी तुम कौन हो?

**कासम :**— मेरे गुलनार नारी तुम कौन हो —? [ आलफखाँ त्याच्या पाठीवर थाप मारतो तो कळवळतो. ]

**आलफखाँ :**— पागल! तेरी नहीं मेरी कहो। बदमाष कहींका; चल हट बाजूला। [ विजयेकडे वळून ] मेरी बुलबूल, मेरे खुशीओंका चाँद! तुम कौन हो बताव?

**सिध्दराज** :— तुम कौन हो पूछनेवाले जी — ?

**आलफखाँ** :— मैं कौन? हं, कासम, बता दो अिस बुढ्ढे को – मैं कौन हूँ।

**कासम** :— अबे बुड्ढ ..........!

**विजया** :— हाँ खबरदार! अदबीसे बात करो.

**आलफखाँ** :— [ कासमच्या पाठीवर थाप मारून ] गद्धा कहींका! जानता नहीं अदबीसे बात करो।

**कासम** :— अजि क्या पूछ रहे हैं आप? यह मोंगल सेनापति बहाद्दरखाँके साले — सरदार सलाबतजंग ———

**आलफखाँ** :— समशेरजंग, जंगबहाद्दुर जंगलका शेर सरदार आलफखाँ!

**सिद्धराज** :— सरदार आलफखाँ! नाम तो सुन चुका हूँ, सुरतभी शायद कभी न कभी देखी होगी, लेकीन कहां — याद नहीं.

**आलफखाँ** :— हाँ, शायद अपने जवानीमें कभी देखा होगा मुझे। [ कासम हंसतो ] क्यौं बे गद्धे हँसता है क्यौं ?

**कासम** :— हुजूर, अिनके जवानीमें आप शायद पैदा भी नही हुअे होंगे।

**आलफखाँ** :— हट, चूप रहो पागल।

**सिद्धराज** :— बेटी, तुझे याद है, हमनें अिन्हें कभी कहां देखा था?

**विजया** :— हाँ अब्बाजान। सुलतान खिलजीके दरबारमें देखा होगा।

**आलफखाँ** :— शाब्बास! तुमने तो मुझे बिलकूल ठीक पहचानलिया। [ कासमकडे पाहून ] और यह गद्धा कहता है, मैं पैदाभी नहीं हुआ था। रूपसुंदरी क्या आप उधरसे यहाँ आयी ?

**विजया** :— जी हाँ हुजूर।

**आलफखाँ** :— शाब्बास प्यारी! मैं हुजूर तो हूँ, लेकीन इस गद्धेका। प्यारी, आपका मैं दास हूँ। [ विजया कुर्निसात करते. ] क्या आप वही दरबारमें नाचगाना करती थी?

**विजया :**— जी हाँ हुजूर।

**आलफखाँ :**— देखो, फिर तुमने मुझे हुजूर कहा। [ विजया फिरून कुर्निसात करते ] ठीक है! मुझे तो अैसे नर्तकीकी बहोत जरूरत थी। बडा काम हो गया। [ कासमकडं पाहून ] क्यौं जी ?

**कासम :**— हां हां बडा काम होगया. [ दुसरीकडं स्वगत ] बेव्या, तुझंच काम निघायची वेळ आली आहे आतां.

**सिध्द्राज :**— मैं चहाता था कि – लडकी के साथ देश – विदेश घुमकर, राजा – महाराजाओंको खूष करके फिर लौट आयेगा!

**आलफखाँ :**— अबे बुढ्ढे! राजा – महाराजाओंकी क्या जरूरत – ? हम जींदे है न? हमको खूष करो! और जो चाहिये ————

**कासम :**— वो सलाबतजंग, समशेरजंग, जंगबहादुर और गद्धो के हुजूरसे ————

**आलफखाँ :**— अँ! [ विजया हंसते ] क्या कहाँ कंबख्त्......?

**विजया :**— [ हंसू आवरून ] जी हाँ! अभी अभी तो आपने कहा था —

**आलफखाँ :**— बिलकूल ठीक! प्यारी, तुम हमको खूष करो. अिधरके सब राजा – महाराजा हमारे मांडलिक बन चुके है ...!

**विजया :**— लेकीन खाँसाहेब, जितना जादा दाम अुतना वही नाचनेका मेरा काम!

**आलफखाँ :**— सुनो नर्तकी ये आलफखाँ तेरे लिये अपने दिल का खजीना हर्दम खूला रखेगा.

**सिद्धराज :**— हम अैसा नहीं चाहते खाँसाहेब!

**विजया :**— हम रोकड दाम चहाते हैं!

**आलफखाँ :**— बस्! चाहे दामही कहो! देखो, लेकीन दो शर्थपर। दाम की क्या, दामही दाम।

**विजया :**— क्या शर्थ होती है जी बताये!

**आलफखाँ :—** प्यारी, शर्थ तो बिलकूल मामूली है।

**सिद्धराज :—** सलाबतजंग कहो, हो सके तो हम जरूर करेंगे!

**आलफखाँ :—** सुनो! हमने अेक रजपूत राजाको नजर कैद करके यहाँ रख्खा है। नाच - गानेसे उसका दील बहलाना और प्रेमके बहानेसे उसपर नज़र रखना। बस् इतनाही काम तुम्हें करना पडेगा। क्यौं? ठीक है न?

**कासम :—** [ स्वगत ] आंधळा मागतो एक देणारा देतो दोन!

**विजया :—** जी हाँ! लेकिन मैं अुनका ... नाम सुन सकती हूँ ?

**आलफखाँ :—** जरूर, क्यौं नहीं? जिसका नाम सुनतेही हमारी मोंगल सेना डरके मारे पीछे हट जाती है! वह है मंगलगडका राणा विजयसिंह —!

**सिद्धराज :—** कौन विजयसिंह! मंगलगडका शेर [ अंगांत कांपरे भरल्याचे सोंग करतात ] तोबा, तोबा. बेटी, उसका नाम तो मैंने अभी अभी आग्रेमें सूना था! बडा काफर है वह! उसे तो खुद सुलतान भी डरता है! बेटा, उस सैतानपर प्रेमके बहानेसे नजर रखना कोइ आसान नहीं!

**कासम :—** [ स्वगत ] गुरुराज, सावज तर पक्कं जाळ्यांत अडकावित अहांत.

**विजया :—** [ घाबरल्याचें सोंग करून ] या अल्ला! तो ..........

**आलफखाँ :—** बस्! तुम तो अभिसेही डर गयी? वह सिर्फ हमारे लिये काफर है। तेरे लिये वह पागल बन जायेगा। नाच - गानेवालीसे वह तो बडी मोहब्बत करता है। डरनेकी क्या बात है?

**सिद्धराज :—** नहीं नहीं बेटी!

**आलफखाँ :—** प्यारी, अैसा वख्त् फिर कभी नहीं आयेगा। बुड्ढे, देश-विदेश घूमकर जितना नही ला सकोगे अुस से भी जादा हम आपको दे डालेंगे। प्यारी, तेरे चरणोंपर दामकी बरसात कर दूंगा।

**सिध्दराज :—** बेटी मरीना, मुझे तो बिल्कूल डरसा लगता है।

**आलफखाँ :—** अबे, थोडे दिनकी तो बात है! डरनेकी क्या जरूरत? प्यारी, चाहे मैंभी अुसकी साथ तेरे लिये करूंगा।

**कासम** :— [ स्वगत ] गद्धा, मरणाला अगदीं पुरेपुर आमंत्रण देत आहे.

**विजया** :— अब्बाजान, आप फिर क्यौं अितने डरते हो ?

**आलफखाँ** :— शाब्बास प्यारी ! तुम बडी समझदार है ।

**विजया** :— बस् यह शर्थ मुझे राजी है।

**आलफखाँ** :— हां लेकिन मालूम है न ? तुम्हें अकेली को वहाँ रहना पडेगा।

**कासम** :— [स्वगत] ताईसाहेबांची राखण करणारा हा धवलराय खंबीर आहे.

**विजया** :— जी हां, लेकीन मेरे वालीद कहां जायेंगे ?

**आलफखाँ** :— उसकी फिक्र मत करना । वह शहरमें रहेंगे। मैं उसका बंदोबस्त करता हूँ।

**विजया** :— लेकिन, हमारी मुलाकत कब होगी?

**आलफखाँ** :— जब चहिये तब। यह है मोंगल सेना की छावणी लेकिन तुम्हें शहरमें जा कर अपने वालीद को मिलनेकी अिजाजत दी जायगी।

**विजया** :— तो ठीक है। [ कुर्निसात करते ]

**आलफखाँ** :— शाब्बास मेरे बुलबूल। ले लो यह। [ गळ्यांतील हार काढून देतो ] और बुड्ढ, यह तेरे लिये। ठीक समालो। [मोहारांची पिशवी देतो. ] प्यारी, तुम यहीं खडी रहना। मैं गस्त पूरी करके अभी अभी लौट आतां हूँ। चलो कासम। [ जातात ]

**सिद्धराज** :— [ ते गेल्याची खात्री करून घेवून ] बेटा, हें काय भलतंच धाडस ———,

**विजया** :— होय बाबा ! पण माझ्याबद्दल भीण्याचं कांहींच कारण नाहीं ! संधि कशी अगदीं नामी आली आहे ! बाबा, आपण याच गांवांत फिरते रहा. पहा कशी लवकरच संधि साधून मी विजयना बाहेर काढते !

**सिद्धराज** :— पण बेटी — ही मोंगल ——

**विजया** :— तशीच वेळ आली तर हा पहा माझा सोबती! [ जंबिया काढून दाखविते. ] माझं रक्षण करण्यांस समर्थ आहे. [ आलफखाँची चाहूल येते. विजया जंबिया लपवते. ]

**सिद्धराज** :— तो ठीक है बेटा, मैं गांवमें रहूँगा [ आलफखाँ प्र. क. ] बहोत होशियारिसे अपना जी संभालकर रहना!

**विजया** :— अब्बाजान, मेरी फिक्र मत करना। आपको मिलने के लिये मैं गांव चली आवूंगी! क्यौं जी?

**आलफखाँ** :— हाँ हाँ, जरूर। चलो प्यारी। [ जातात. विजया हळूंच सिद्धराजाना न भिण्याबद्दल डोळ्यांनीं खुणवते. व जाते. ]

**सिद्धराज** :— आतां काय होणार पुढं —? [ अेक दिर्घ उसासा टाकतात. ] जय श्री एकलिंगजी! जय श्री चंडिकेश्वरा!! [ जातात. ]

## [ प्रवेश २ रा ]

[ स्थळ :- अीडरच्या छावणींतिल राणा विजयसिंहाचा महाल. विजयसिंह आसनावर बसलेला आहे. हुजूरे दोन्हीं बाजूनें वारा घालीत आहेत. जवळच अेका आसनावर दुर्जनसिंह बसलेला आहे. ]

**दुर्जनसिंह** :— राणाजी, सत्कारांत या सेवकाकडून कांहीं उणीव तर पडत नाहीं ना?

**विजयसिंह** :— अुणीव? सरदारसाहेब, अिथं सुख-शान्तीचं साम्राज्य पसरलेलं आहे. माझ्या राज्यांतही मी इतकं अनुभवलं नव्हतं. माझ्यासाठीं आपण हा राजमहाल तयार केलांत, हें सिंहासन तयार केलंत ———

**दुर्जनसिंह** :— या सेवकाचं तें कर्तव्यच होतं. राणाजींची कोणतीही अिच्छा असो, आज्ञा करावी. सारी शक्ति पणास लावून मी ती पूर्ण करण्यास तयार आहे.

**विजयसिंह** :— पण सांगण्यां अगोदरच ती पूर्ण होत आहे. मेरे जीगरदोस्त, तुम्हीं माझा अेखाद्या सम्राटासारखा मानमरातब ठेवीत अहांत!

**दुर्जनसिंह** :— [ जमीनीपर्यंत लवून मुजरा करून ] आपणच तर या देशाचे खरे सम्राट अहांत!

**विजयसिंह** :— [ हंसून ] सम्राट! मी सम्राट! सरदार, मी अेक राज्यहीन भिकारी आहे. सम्राट म्हणून संबोधून — [ आलफखाँ प्रवेश करतो. ]

**आलफखाँ** :— कैसी बातें करते हो महाराणाजी? हमें शरमींदा करते हो क्या आपही तो मेवाड के सम्राट हो। और किसी को भी हम सम्राट नहीं कह सकते।

**दुर्जनसिंह** :— आपण आम्हांला किती सन्मानानं वागवलंत तें आम्हीं कसं विसरूं?

**आलफखाँ** :— अब छोड दो अुसी बात को। महाराणा, अिसी वख्त् मैं गानाबजाना चहाता हूँ।

**विजयसिंह** :— हाँ हाँ क्यों नहीं ?

**आलफखाँ** :— आज तो हम महाराणा को खुशी के सागरमेंही डुबाऊँगा. दुर्जनजी, अैसी चीज लायी है कि कुछ पूछो मत! मेरा नाम सुनकर वह दिल्ली दरबारमें यहाँतक चली आयी. [ टाळी वाजवितो. विजया नर्तकीच्या वेषांत प्रवेश करते व त्रिवार कुर्निसात करते ] अे, रूपसुंदरी. अैसा संगित हो जाय कि हमारे महाराणा बिलकुल खूष हो जाय! [ आसनावर बसतो. ]

**विजया** :— [ कुर्निसात करून नाचत पद म्हणूं लागते. ]

## [ पद १५ वें ]

**क्यौं बरसत है सघन श्याम धर वर्षामहँ जल - धारा**
**जो न जगाते भूमंडळ पर हास्य - हर्ष - सूख - प्यारा ॥ क्यौं ॥**
**तदपि हँसे जो भूमी, हँसी का तो वह ढंग निराला**
**अुपर हँसी, हृदयके भीतर रंग है पर सब काला ॥ १ ॥**

[ विजया कुर्निसात करते. ]

**विजयसिंह** :— वाहवा! बहोत खूष! किती मधूर संगीत!

**आलफखाँ** :— हाँ महाराणा, बहोत अच्छा हुआ संगीत। और भी चहाते हो न? अहाहा! कोयल के स्वरसे भी मधूरस्वर। अमृत जैसी वाणी नंदनवनकी सुगंधसे भरी हुअी हास्य की तरंगे। मोती की तरह दंत - पंक्तीयाँ। लैला शिरी अुर्वशी को भी शर्मानेवाला सौंदर्य। सूरत देखते ही लगता है, मानों घने मेघ का पर्दा खोलकर हँसता हुआ चाँद निकल आया। नाच गाने से स्वर्ग को भी भूपर लानेवाली ………., प्यारी तुम गाओ, फिर नाचो — गाओ।

**विजया** :— [ फिरून कुर्निसात करते व गाणे म्हणते. ]

## [ पद १६ वें ]

**आज है नव उत्सवका रंग।**
**नये रत्न आभूषण सजा दो, प्रकृति - सती के अंग ॥ धृ० ॥**
**आज पुराना सभी हटा दो, जो है मलीन कुरंग —**
**उसे मिटा दो, देखे सब जग नया तुम्हारा ढंग —**
**जीवन - मरण बना दो ऊज्वल, दे आशा का रंग ॥ आज ॥**

**विजयसिंह** :— जीवन-मरण बना दो ऊज्वल, दे आशा का रंग। दुर्जनजी आम्हीं आमचं जीवन खरोखरच ऊज्वल बनविणार आहोंत. [ दुर्जन मानभावीपणानं मुजरा करतो. ] सुंदरी, तुझं नांव काय?

**विजया** :— जी सरकार, मरीना है मेरा नाम।

**विजयसिंह** :— मरीना? बिलकुल झूट। खानसाहेब, अशा सुंदरीला कोण मरीना म्हणेल?

**आलफखाँ** :— किसकी मजाल है?

**विजयसिंह** :— मरीना, आम्ही तुझं नांव खजिना ठेवित आहोंत. [ विजया कुर्निसात करते. ] खजीने, हें गाणं तुला कुणी शिकवलं?

**विजया** :— माझ्या उस्तादन!

**विजयसिंह** :— अेकूण तुझा उस्ताद मोठा रसीक दिसतो आहे तर........!

**विजया** :— खावंद, आपण काय कमी रसीक अहांत ?

**विजयसिंह** :— वा! तूं तर बोलण्यांतहि चतूर दिसतेस! [ विजया कुर्निसात करते. दुर्जनसिंह मिशावर पीळ भरत असतो. आलफखाँ दुर्जेनकडं पाहून अैटीनं सावरून बसतो. ] सुंदरी, आमची तब्बियत तुझ्यावर अगदीं खूष आहे. होवूं दे आणखी अेक.

**आलफखाँ** :— प्यारी, गाओ, फिर गाओ. आंखो के आगेसे यह पृथ्वी हट जाय। तुम गातीही रहो।

**विजया** :— [ कुर्निसात करून परत गावूं लागते. ]

## [ पद १७ वें ]

**निपट मेरे हैं, तो फिर लगता है वह न मेरा है।**
**निहारूं नित्य, पर परिचय न अबतक उन्हें न पाया है ॥ नि० ॥**
**हृदय के बीच हैं पर पास पाती हूँ न उस को।**
**उस की खोजमें, अपने को भी मैंने गवाँ दी है।**
**मिले पलमें, फिर अेक पलमें भी न मिलता है।**
**मिलनमें खो भी जाता है, विरहमें मिलही सकता है ॥ १ ॥**

[ कुर्निसात करते. ]

**आलफखाँ** :— विरहमें मिलही सकता है। वाहव्वा प्यारी, तुमने तो कमाल कर दिया. [ अेक सैनिक प्रवेश करतो. ] क्या है बे —?

**सैनिक** :— हुजूर, दिल्लीसे कोअी जासूद आया है।

**दुर्जनसिंह** :— दिल्लीसे जासूद —! [ आलफखाँकडे पहातो. ]

**आलफखाँ** :— महाराणा ——

**विजयसिंह** :— हां हां सरदार आप जा सकते हैं।

**दुर्जनसिंह** :— चलिये खानसाहेब — [ दोघे जातात. ]

**विजयसिंह** :— अे, तुमभी सब चले जाव यहाँ से। [ हुजरे कुर्निसात करून जातात. ] शाब्बास खजीना, तूं तर आज आमचे दील बेहोष करून सोडलेस.

**विजया** :— खावंदाना आवडला माझा नाच ?

**विजयसिंह** :— प्यारी, तूं कुणाला आवडणार नाहींस! [ उठून तिला धरायला जातो. ]

**विजया** :— [ दूर होवून ] अहं, महाराज मी अेक कुलकुमारीका आहे.

**विजयसिंह** :— [ थबकून ] खजीना, तूं तूं कुलकुमारीका? मला वाटतं तूं शराब घेतली आहेस. अेक नाचणारी कुलकुमारीका ! हं! [ हंसतो. ]

**विजया** :— महाराज, दुर्जनसिंहाच्या हातीं पडल्यावर अमृताचं विष बनतं, आणि कुलीनकुमारीकांनाही वेश्या बनावं लागतं, हा आपल्या दोस्तांच्या सामर्थ्याचा प्रभाव आहे.

**विजयसिंह** :— वा! माझ्या दोस्तांचं सामर्थ्य फारच मोठं आहे तर —?

**विजया** :— महाराज, तसं त्यांचं सामर्थ्य नसतं तर ............ आपणासारख्या ——

**विजयसिंह** :— काय म्हणालीस — ?

**विजया** :— म्हटलं आपल्यासारख्या बड्या पाहुण्यांना खूष करण्यांसाठीं शेंकडो कुमारीकांना नर्तकी म्हणून आपल्यापुढ कशा अुभ्या केल्या असत्या? त्याना अशक्य असं कांहींच नाहीं म्हणा !

**विजयसिंह** :— छोड दो अुस बातको. खजीने, माझ्या प्राणा ये, माझ्या अशी जवळ ये.

**विजया** :— क्षमा करा महाराज !

**विजयसिंह** :— कां? अितका परकेपणा कां? [ विजया गप्प रहाते ] हं, समजलों ! मी राज्यहीन राजा आहे! कफल्लक आहे !!

**विजया** :— असं काय बरं बोलतां महाराज? मी आपली निराशा कधींही करणार नाहीं. आपण घ्या करून मला आपली; कीं मी आपलीच आहे.

**विजयसिंह** :— खजीनें, या विजयसिंहाच्या अंतःकरणावर आतां सर्वस्वी तुझाच ताबा आहे.

**यिजया** :— अहाहा....! खरंच का महाराज हें —?

**विजयसिंह** :— अजूनहि माझ्याबद्दल तुला शंका येते? वेडे, आतां तूंच या विजयसिंहाची हृदयेश्वरी आहेस.

**विजया** :— तर मग महाराज, प्रेमाच्या पावित्र्याला शुभकालाची आवश्यकता पाहिजे न? आणि तो शुभकाल दूर अगर नजिक आणणं हें या पुढं सर्वस्वी आपल्याच हातीं आहे.

**विजयसिंह** :— ही काय बोलणी कामाची? खजीने, तूं माझी असतीस, माझ्या शब्दावर तुझा विश्वास असता, तर — माझ्या आज्ञेसरशीं माझ्या जवळ आली असतीस! [ विजया त्याचा हात धरून त्याला कोचावर बसविते. ]

**विजया** :— असं वेड्यासारखं कांहीं तरीच बोलायचं नाहीं! मी आपलीच आहे. पण जीवलगा, मुल्लाच्या आज्ञेवांचून मला आपली होतां येणार नाहीं! धार्मीक संस्कारावांचून मिळणारं सुख मला नको आहे. महाराज, जे अल्लाला अमान्य आहे, तें कुणीही करूं नये.

**विजयसिंह** :— तर मग काय तुझ्या अल्लाच्या मनांतून मी मुसलमान व्हावं असं आहे? खजीना, मीं सर्व कांहीं गमावून बसलों आहे, माझ्या जवळ आतां फक्त माझा धर्म तेवढाच शिल्लक राहिला आहे! अिथं नाच-रंगांत मी जरी दंग असलों, तरी माझा प्यारा धर्म मी केव्हांही गमावणार नाहीं!

**विजया** :— अहाहा! महाराज, काय अमृतवाणी अैकवलीत! आज खऱ्या रजपूताला शोभेल असं आपण बोललांत! नका महाराज माझ्यासाठीं कांहींही गमावून बसूं नका. मी आपणाला कधींच तसं सांगणार नाहीं. हा माझा प्राणही मी आपणासाठीं अर्पण करीन.

**विजयसिंह** :— तर मग तूं अशी दूर कां रहातेस?

**विजया** :— सांगू?

**विजयसिंह** :— सांग, खुशाल सांग!

**विजया** :— आधीं अेक प्रश्न विचारूं?

**विजयसिंह** :— अगदीं मोकळ्या मनानं विचार!

**विजया** :— महाराज, राग तर येणार नाहींना?

**विजयसिंह** :— तुझ्यावर रागावेन? वेडी कुठची! खुशाल विचार!

**विजया** :— पारतंत्र्यात विवाह म्हणजे माणूसकीला कलंक आहे, असं नाहीं वाटत आपणाला?

**विजयसिंह** :— मग काय मी पराधीन आहे, असं तुला वाटतं?

**विजया** :— पराधीनच नव्हे तर — महाराज, यवनांनी आपणाला अन्नाचा गुलाम केलं आहे! दुर्जनसिंहाचे आपण इथं नजरबंद कैदी आहांत.

**विजयसिंह** :— [ अुठून ] बेताल स्त्रीये, जीभेला गवसणी घाल. तुझ्या जागीं यावेळीं दुसरा कुणी असता तर जबानच खेंचून काढली असती!

**विजया** :— महाराज, या खजीनेची जबान कल्पांतीहि खोटी ठरणार नाहीं!

**विजयसिंह** :— खजीना, माझ्या बाहूंत सामर्थ्य आहे, डोक्यांत अक्कल आहे, अंगांत तारुण्याचं रक्त जोमानं सळसळत आहे, आणि म्हणूनच तर मोंगल सम्राटानं माझ्याशीं तह केला आहे.

**विजया** :— तह! तह नव्हे हां महाराज. तहाचं निव्वळ सोंग आहे हें!

**विजयसिंह** :— चूप रहा तुझ्या तोंडीं असली बेजबाबदारीची भाषा शोभत नाहीं! आपल्या जीवाची फिकीर न करतां ज्यानं मला भावाच्या बंदिवासांतून सोडवलं तो दुर्जन माझ्याशीं प्रतारणा करील? शक्य नाहीं! अेक वेळ पूर्वेचा सूर्य पश्चिमेस उगवेल; पण विश्वासघाताचं पातक दुर्जनच्या हातून मुळींच घडणार नाहीं!

**विजया** :— [ जवळ जावून ] महाराज, माझ्यावर विश्वास ठेवा! तुमची खजीना तुम्हांला कधींहि फसवणार नाहीं!

**विजयसिंह** :— काय पुरावा आहे तुझ्याजवळ ?

**विजया** :— माझी जबान हाच माझा पुरावा महाराज !

**विजयसिंह** :— तुझ्या सांगण्यांवर विश्वास कसा ठेवावा ? कडू कारल्यांत कधीं मधुरता ——

**विजया** :— हां महाराज, कडू कारल्यांत जर मधुरता आली तर ते अेक मोठें आश्चर्यच नव्हे का ?

**विजयसिंह** :— चांडाळणी, तूं नर्तकी आहेस कीं दुसरी कुणी ——— [ तिला खेंचतो त्या बरोबर ती डोकीवरील टोप अंगावरील ओढणी फेंकून देते.- विजयसिंह दचकतो. ] कोण ....... ? विजया !

**विजया** :— होय महाराज, विजया ओळख पटली तर ?

**विजयसिंह** :— [ भावनावेगानें तिला हृदयाशीं धरतो. ] विजये, हें भलतंच धाडस तूं कां केलंस ?

**विजया** :— सिंहाला त्याच्या पडलेल्या विस्मृतीची जाग देण्यसाठीं ! महाराज, काय केलंत हें ? अभिमानानं आंधळे होवून, अजाणतेपणीं दुर्जनसिंहाचे कैदी बनलांत ....... !

**विजयसिंह** :— [ तिला दूर करून ] नाहीं नाहीं विजये, तुझा गैरसमज झाला आहे. पहा, मी इथं अेखाद्या सम्राटासारखा वावरतो आहे — !

**विजया** :— महाराज, थोड्याच वेळापूर्वीचे बोल विसरलांत ? मी राज्यहिन राजा ! कफल्लक !! कां — ? आपण जाणूनबुजून या बेगडी मुलाम्याला का भाळलां ? महाराज, आपल्या करणीनं भाअीला किती दुःख झालं आहे !

**विजयसिंह** :— विजये, माझा अुत्कर्षच जिथं दादासाहेबांना पहावला नाहीं .... ! आणि त्यामुळंच जर ते दुःखी झाले असतील तर त्यांत नवल असं कांहींच नाहीं.

**विजया** :— महाराज, हें बोलणं आपल्याला मुळींच शोभत नाहीं. सबंध राज्य आपल्या हवाली करण्यांस आज भाअी तयार आहे. महाराज, आपले हे विचार राष्ट्रकार्याची तर हानी करणार आहेतच; आणि शिवाय ———

**विजयसिंह** :— तुलाही मजबद्दल शंका येते तर —!

**विजया** :— खरंच! कां येवूं नये? मला शंकेला जागा ठेवूं नका. भाअीबद्दल असा गैरसमज करून घेवूं नका! माझ्या बरोबर चला आपण —,

**विजयसिंह** :— वेडे, ज्यांनीं मला माझ्या राज्यांतून हुसकावून लावलं ते दादासाहेब सबंध राज्य माझ्या हवालीं करणार म्हणतेस? आणि हेंच सांगण्यांसाठीं तूं अिथं हें अेवढें धाडस करून आलीस? जा, अशीच जा, आणि दादासाहेबांना जावून सांग कीं, पवनगडच्या सिंहासनासाठीं हा विजय भुकेलेला नाहीं! माझ्या बहादुरीवरच मी मेवाडचं सिंहासन मिळवीन —!

**विजया** :— नका, नका महाराज, असा गैरसमजानं त्रागा करून घेवूं नका स्वखुषीनं या यवनी पिंजऱ्यांत स्वतःला अडकवून घेवूं नका!

**विजयसिंह** :— तितकं माझं अजून अधःपतन झालं नाहीं —!

**विजया** :— महाराज, महाराज, माझं अैका! तुमची ही विजया, ह्या विजयेसाठीं तरी परत भाअीकडं चला ——!

**विजयसिंह** :— तें आतां शक्य नाहीं! व्हायचं तें झालं! वाटल्यास तूं इथं रहा, वाटल्यास निघून जा! मला तसं यायचं नाहीं.

**विजया** :— [ जवळील जंबीया काढून ] तर मग हा घ्या! अशा आततांईपणानं स्वतःच्या प्राणाची आहुति देण्यांअगोदर — आपल्याच हातानीं या आपल्या विजयेचा निकाल लावा आणि मग खुशाल ———

**विजयसिंह** :— विजये —,

**[ पद १८ वें ]**

**जिला मानिली मीं प्राणसखी सहचारी।**
**संशया ग्रासिली मत्सरी ॥ धृ० ॥**
**कठोर किमया ललना न शोभे।**
**त्यजिता ती मृदू - भाषिणी।**
**नच खुलवि मना कामिनी ॥ १ ॥**

हा आततांईपणा तुला तर बिलकुल शोभत नाहीं.

**विजया** :— अेकलिंगजीची शपथ आहे आपणाला! आपल्या हातानं आलेल्या मरणानं मी धन्य होईन. [ जंबियाचा हात पुढं करते ] नाहीं घेत? तर मग ही पहा —, [ स्वतःवर जंबिया मारून घेवूं लागते. ]

**विजयसिंह** :— [ तिचा हात पकडून ] तर मग अैक —, माझी तलवार अद्याप गंजलेली नाहीं! विजया, मनांत आणिन त्यावेळीं हा तुझा विजय स्वतंत्र होअील!

**विजया** :— कधीं? वेळ निघून गेल्यावर?

**विजयसिंह** :— मी इथं कैदी आहे हें तूं मला पटवून देशील?

**विजया** :— शहानिशा पटवल्यावर काय द्याल?

**विजयसिंह** :— [ तिला जवळ घेवून ] तूं सांगशील तें मीं अैकेन हं!

— पडदा पडतो —

## प्रवेश ३ रा

[ स्थळः— अीडरच्या छावणीबाहेरील जंगलांतिल एक वाट. गुरुदेव सिद्धराज फकिराच्या वेषांत प्रवेश करतात. ]

**सिध्दराज** :— बा काला, कोण ही तुझी वक्रगति! जिनं कधीं ऊन पाहिलं नाहीं, राजवाड्यांत अैष-आरामांत लोळण्यांखेरीज जिला कधीं बाह्य जगाची ओळख नव्हती ती अजाण पोर सुजाण बनून आज आपल्या नशिबाशीं टक्कर देण्यांसाठीं बाहेर पडली आहे! आणि तूं? अेकाच मातेच्या अुदरीं जन्म घेतलेल्या दोन भावंडांत अंतःकलहाचं बीज पेरून मानवाच्या कर्तृत्वाची अवहेलना करीत आहेस! तुझी महिमा अगाध आहे खरी; पण यांत तूं काय साधणार आहेस? रजपूतांचा सोज्वळपणा तर तुला पहावला नाहीं ना? रजपूतांच्या राष्ट्रप्रेमाची तर ही कसोटी तूं घेत नाहींस ना? [ चाहूल घेवून ] कोण बरं धांवत येत आहे हा? [ मुसलमान दिसणारा असा धवलराय येवून गुरुदेवांचे चरण धरतो. गुरुदेव आश्चर्यचकित होतात. ] कोण आहेस तूं? काय पाहिजे आहे तुला?

**धवलराय** :— प्रभूराज, मी अेक हिंदु, क्षत्रिय आहे. कालाच्या प्रवाहानं दिसायला मोंगल बनलों आहे.

**सिद्धराज** :— मला वाटतं तूं अस्सल क्षत्रिय नसावास !

**धवलराय** :— प्रभुराज, तेलंगणांच्या जंगलांत योग्य संधिची वाट पहा तुझे मनोरथ पूर्ण होतील, असा ज्याला आशीर्वाद दिलांत तो ——

**सिद्धराज** :— [ त्याला उठवून ] कोण धवलराय! तेलंगणाचा शूर सेनापति!! [ जवळ घेतात. ]

**धवलराय** :— होय प्रभुराज तोच हा अभागी ! प्रभो त्यानंतर या वेषांत बहादूरखाँच्या सैन्यांत प्रवेश केला. त्या दिवशीं प्रथम दर्शनीच मी आपणाला ओळखलं होतं. माझं सुदैव थोर म्हणूनच माझ्या ध्येयपूर्तींत आणखी ताईसाहेबांची भर पडली आणि आज आपलं दर्शन घेण्याचा हा योग जुळून आला. [ कमरेतला लखोटा गुरुदेवांच्या हातीं देतो. ]

**सिद्धराज** :— [ लखोटा वाचून ] वत्सा, दुर्जनांचा काटा काढण्याची संधि तुला अजून प्राप्त झाली नाहीं तर !

**धवलराय** :— प्रभुराज, आतां तसा प्रयत्न करणं धोक्याचं आहे. दुर्जनला मारल्यानं ताईसाहेबांच्या प्रयत्नावर पाणी पडेल, खऱ्या वस्तुस्थितीची कल्पना विजयसिंह महाराजांना नाहीं. आतां दुर्जनच्या कृष्णकारस्थानांतून प्रथम विजयसिंह महाराजांची सुटका आणि मग त्या नीचाचा समाचार.

**सिद्धराज** :— अगदीं बरोबर. विजयसिंहाबरोबर तुला कधीं बोलण्याचा प्रसंग आला आहे कां ?

**धवलराय** :— नाहीं प्रभो, दुर्जनसिंहानं फारच करडा पहारा ठेवला आहे. त्याच्या विश्वासातल्या माणसाशिवाय राणाजींच्या जवळ कोणाला फिरकायलासुद्धां मिळत नाहीं. ताईसाहेबांनीं मात्र त्याला हातोहात चकवलं आहे.

**सिद्धराज** :— ठीक आहे. देव धर्म आणि देश राखण्यांसाठीं तुला जें कांहीं करतां येईल तें तूं आवश्य कर. जा बेटा ! विजयेला म्हणावं मी ठरल्यावेळीं हजर आहे.

**धवलराय** :— आज्ञा प्रभो ! [ वंदन करून ] व्रतसाफल्याचा आशिर्वाद द्या.

**सिध्दराज** :— [ आशिर्वाद देवून ] जा बेटा. तुझी कामना पूर्ण होवो. [ धवलराय जातो. ] अुद्यां विजयसिंहाला याच जंगलांत विजया शिकारीच्या निमित्तानं आणणार आहे! जय श्री अेकलिंगजी! माझ्या बालेच्या प्रयत्नाला यश दे! [ जातात. ]

## [ प्रवेश ४ था ]

[ स्थळ :– दुर्जनचा महाल. दुर्जन अेराझारा घालीत आहे. मेजावर अेक लखोटा आहे. मध्येंच थांबून ]

**दुर्जनसिंह** :— या मरिनेचा मला आतां दाट संशय येवूं लागला आहे! तिच्या प्रत्येक हालचालीवर मी पाळत ठेवतो खरा; पण ती पोर मोठीच कावेबाज दिसते. कांहींच दाद लागूं देत नाहीं. आलफखाँनी तिला आणली खरी; पण तिच्यात कांहींतरी पाणी मुरतं आहे खास! त्या दिवसापासून ती विजयसिंहाबरोबर सारख्या गुलगुल गोष्टी करीत असते आणि या अेकाच गोष्टीनं माझा संशय दुणावत चालला आहे. बस्! याची पुरी शहानिशा लावलीच पाहिजे. नाहींतर गळयाला लागायचं.

**आलफखाँ** :— [ प्रवेश करून ] अहो, हातांत नाहीं तर गळ्याला लागणार कुठून? आधीं हात आणि मग गळा.

**दुर्जनसिंह** :— खानसाहेब, तुम्हांला तर मरीनाशिवाय दुसरं कांहींच दिसेनासं झालं आहे. मला तुमच्या त्या मरिनेचा दाट संशय येतो आहे. ती नर्तकी मुळींच नाहीं. तिची प्रत्येक हालचाल चमत्कारीक दिसते आहे. ज्या ज्या वेळीं मी विजयसिंहाच्या भेटीस जातो त्या त्या वेळीं तिची हालचाल मला समयसूचक वाटते. वाटतं, तिनं आपल्या बुद्धिचातुर्यानं तर आमच्या जागत्या डोळ्यांवर पडदा टाकला नसेल नां? तुम्हांला भुरळ पाडली नसेल नां?

**आलफखाँ** :— बिलकुल नाहीं! या डोळ्यांनीं मी तिला दिल्लीदरबारांत पाहिली आहे. आणि माझ्या डोळ्यांवर माझा पूर्ण विश्वास आहे. दोस्त, तुम्हांला संशयानं

पछाडलंय! ज्या राजस्थानांत पोरींसाठीं वणवण फिरूनही पोर चुकून दृष्टीस पडायला तयार नाहीं त्या ह्या तुमच्या भिकारड्या देशांत पोरी हेर म्हणून जर वावरणार असतील तर जन्मभर हा आलफखाँ इथंच जंग मारीत राहील.

**दुर्जनसिंह :**— तुमच्या या बडबडीनं माझं माथं फिरून जाण्याची वेळ आली आहे.

**आलफखाँ :**— दोस्त छोड दो उस बातको। बस थोडे तो दिन बाकी है! नाहक विचार करनेसे भेजा बिगड जाता है। विचार करना है तो सिर्फ रंजनेका करो प्यारीओंका करो। दिलके अरमान का करो। ओ, [विजया प्रवेश करते] आवो आवो प्यारी आवो!

**दुर्जनसिंह :**— [स्वगत] नेमकी याच वेळीं ही इथं यावी? नक्कीच कांहींतरी पाणी मुरतं आहे.

**विजया :**— कितने बुरे हैं आप? मैं उधर आपका तलास कर रही थी। और आप यहाँ?

**आलफखाँ :**— प्यारी बुरा तो हूँ लेकिन तेरे लिये नहीं। कहो क्या बात है?

**विजया :**— खानसाहेब, आज बडी खुशी मालूम पडती है! और वह रंजना कौन है?

**आलफखाँ :**— क्या कहा रंजना? वे तो दुर्जनजीकी होनेवाली बिबी है। दुर्जनजी उसे बहोत चाहते हैं।

**विजया :**— कितना अच्छा नाम है! बडी भाग्यवान होती है वह!

**आलफखाँ :**— और तुम क्या कम समझती हो भाग्यवान अपनेको?

**दुर्जनसिंह :**— ते सर्व राहूं दे! पण मरीना तूं या वेळीं इथं कशी?

**विजया :**— सरदारजी, आपका वो राणाजी बडा लहरी आदमी मालूम पडता है!

**आलफखाँ :**— वो लहरी था अिसलिये तो वो हमारे फंदेमें फँस गया।

**विजया :**— मुझे कहता था, आज हम शिकार खेलनेके लिये जंगलमें चले जायेंगे। मैं क्या कहेनेवाली थी? आपको कहनेके लिये मैं जल्दिसे यहाँ चली आयी।

**आलफखाँ** :— शाब्बास प्यारी! बहोत अच्छा किया तुमने। क्या दुर्जनजी, देखालिया नं?

**दुर्जनसिंह** :— हें बघ मरिना, कांहींतरी थाप देवून तुझ्याच भोंवती घुटमळत ठेव जा त्याला!

**विजया** :— लेकीन अब तो वो वेस के पासभी शायद चला गया होगा।

**दुर्जनसिंह** :— मग पळ तर जा त्याच्यामागं! मुख्य दरवाजा तूंच उघडून दे त्याला [ विजया जावूं लागते. ] हे पहा पक्की नजर ठेव हं त्याच्यावर?

**आलफखाँ** :— हाँ प्यारी, पिंजरेमे फँसा हुवा शेर पिंजरेसे निकल नहीं जाना चाहिये।

**विजया** :— कुछ फिक्र मत करो जी। नामकी मरिना हूँ, मैं मरिना। [ जाते ]

**दुर्जनसिंह** :— [ ती गेल्याची खात्री करून घेवून ] कौन है उधर? [ सैनिक प्रवेश करतो. ] देखो, अभी दस जवान तयार रख्खो! और दुसरा दस जवान उसके पिछे पिछे रवाना कर दो। याद रख्खो, उसे खबर मत लग जाय।

**सैनिक** :— जी हुजूर! [ कुर्निसात करून जातो. ]

**आलफखाँ** :— दुर्जनजी, आप तो सचमूचही पागल बनगये हो! [ लखोटा हातीं घेतो व वाचतो ] देखो मुलतानकी रसद आधे रास्तेपर दौडती है।

**सैनिक** :— [ प्रवेश करतो. ] हुजूर सब तय्यारी है.

**दुर्जनसिंह** :— अच्छा. चलो. [ जावूं लागतो. ]

**आलफखाँ** :— अरे अरे! आप कहाँ जा रहे हो।

**दुर्जनसिंह** :— खानसाहेब, तुम्हाला त्या पोरीनं झपाटलं आहे. अवढी जिवापाड मेहनत केली आहे ती कशासाठीं? थोडक्यासाठीं आमच्या मेंदूनं मसगवाट पकडली तर सुलतान तुमची आमची साऱ्याचींच कबंधं बनविल! [ जातो. त्याच्या पाठोपाठ सैनिकही जातो. ]

**आलफखाँ** :— [ अराझारा घालीत ] हं! म्हणे डाव हुकला तर सुलतान

आमची कबंधं वनविल. अरे हा आलफखाँ इतका मूर्ख नाहीं मुंडी गमवायला! कोण लेकाचा जाणार आहे तिकडं मग? या दाढीला चाट देवून रजपूत बनून जावूं झालं! आहे काय त्यांत अेवढं मोठसं? रजपूत बनल्यावर तरी अेकादी राजपूतानी मलका बेगम मिळाली तर मिळाली. [ मेजावरील लखोटा पुन्हां हातीं घेतो व तिथंच वाचीत बसतो. ] — पडदा पडतो —

---

## [ प्रवेश ५ वा ]

[ स्थळ :- अीडरच्या छावणीबाहेरील अेक जंगल. विजया व विजयसिंह प्र. क. ]

**विजयसिंह :—** बघीतलंस नां? मी कैदी नाहीं पूर्ण स्वतंत्र आहे अिथं!

**विजया :—** आपण स्वतंत्र आहांत हें इतक्यांतच कसं बरं ताडलंत?

**विजयसिंह :—** [ हंसून ] येवढंही तुला कळूं नयें! मी जर कैदी असतों, तर माझ्या पाठलागावर सभोंवार मोंगल हेरांचा गराडा पडला असता!

**विजया :—** तरीपण महाराज, आपण दुर्जनसिंहाचे कैदीच आहांत——

**विजयसिंह :—** आणि तेंच आजमावून पहाण्यांसाठीं तर आज मी तुझ्या म्हणण्याला रुकार दिला. मी परतंत्र असतों तर अितक्या लांबवर मनमुराद मला कधींच फिरतां आलं नसतं! माझ्या पाठलागावर पांच—दहा——

**सिद्धराज :—** [ प्रवेश करून ] पांच दहाच कां वीस सशस्त्र जवान तुझ्या पाळतीवर आहेत, पण धुंदीमुळं तुला ते दिसेनासे झाले आहेत!

**विजयसिंह :—** कोण आहेस तूं? आणि माझ्याबद्दल तुला अितकी काळजी कां?

**सिद्धराज :—** षंढा, हा प्रश्न तूं मला विचारावास?

**विजयसिंह :—** [ चवताळून ] खबरदार जोगड्या [ अंगावर धावून जावूं लागतो ]

**विजया :—** महाराज——, काय आणि कुणाला बोलतां आहांत हे?

प्रत्यक्ष गुरुदेव ——

**विजयसिंह** :— [ दचकून ] गुरुदेव! [ अंगात कांपरे भरतें. तशा स्थितींत गुरुदेवांचे पाय धरून ] या अजाण बालकाला प्रभुराज क्षमा करा.

**सिद्धराज** :— [ गुरुदेवांची मुद्रा रागानं भेसूर दिसूं लागते. ] क्षमा! तुझ्यासारख्या आतताओी न् अविचारी मुलाला क्षमा! —

**विजया** :— बाबा —! [ केविलवाण्या नजरेनं गुरुदेवांकडे पहाते. गुरुदेव शान्त होतात. ]

**सिद्धराज** :— ऊठ विजयसिंहा! [उठवतात] अरे, कोण ही तुझी शोचनीय अवस्था! बेटा. पूर्वींचं तुझं सामर्थ्य आजही कायम आहे कां?

**विजयसिंह** :— गुरुदेव, मदोन्मत्त हत्तींचं गंडस्थळ फोडणाऱ्या वनशार्दूलाची रग आजही या बाहूंत कायम आहे. पण आपण या अशा वेषांतरांत अिकडे कसे —?

**सिद्धराज** :— या वेषांतरांत वावरतो आहे म्हणूनच तर तुझी भेट झाली! नाहींतर तू कुठला मला भेटायला?

**विजयसिंह** :— कां बरं? छावणींत मी केव्हांही आपणांला भेटलों असतो निदान आपण इथं आला आहांत हें जरी मला कळलं असतं तरी मी आपल्या सेवेसाठीं हजर झालों असतो.

**सिद्धराज** :— किती खुळा आहेस तूं! अरे वेड्या, ती छावणी कसली? कारागृह आहे तें! आणि त्या कारागृहांतील तूं त्यांचा कैदी आहेस! स्वतंत्र आहेस हा तुझा सारा भ्रम आहे.

**विजयसिंह** :— काय, तें कारागृह आहे? मी कैदी आहे? गुरुदेव आपण सांगतां———.

**सिद्धराज** :— अगदीं सत्य तेंच सांगत आहे. चल, तुला खरे-खोटेपणा आतांच पटवून देतो. ते पहा, [ दोघेही पुढं जातात व थोड्याच वेळांत प्र. क. ] पाहिलेंस? तुझ्या भोंवतीं कसा गुप्त पहारा आहे हा? विजय, अरे अजून तरी डोळे उघड अन् शहाणा हो! दुर्जननं तुला कसं फसवलं आहे ——;

**विजयसिंह** :— असं करण्यांत दुर्जनचा हेतू तरी काय असावा! [ विचारांत पडल्यासारखा दिसतो ].

**सिध्दराज** :— राजनीतिज्ञेचा अभाव हेंच तुझ्या नाशाचं कारण आहे. तुला त्यानं अंधारांत ठेवलं आहे. वेड्या, तुला जीवंत ठेवून कैद करण्यांतच त्याचा मुत्सद्दीपणा आहे. आज तूं त्याच्या छावणींत आहेस म्हणून तर मंगलगडचा सारा रजपूत मोंगलाना मिळत आहे! तिकडं बहाद्दरखाँनं फिरून पवनगड वेढला; आणि अिकडं दिल्लीहून जादा कुमक येईपर्यंत; तुला ते "बडा पाहूणा" म्हणून खेळवित आहेत! तुम्हां दोघां भावांचा अशा रीतीनं अेकदम काटा काढण्यांचा त्यांचा मानस असतांना ———

**विजयसिंह** :— [ खवळल्यासारखा होवून ] पुरे पुरे गुरुदेव, नाहीं अैकवत आतां हें? त्या दुष्टान दग्या-फटक्यानं मला कैद केलं काय? [ हातांच्या मुठी वळवून ] गुरुदेव! मी या अपमानाचा सूड घेणार! दुबळे असतील त्यांनीं भ्यावं! माझी समशेर या अपमानाचा सूड घेईल!

**विजया** :— पण महाराज, आधीं आत्मरक्षण आणि नंतर सूड —!

**विजयसिंह** :— दोस्त शत्रू बनला अर्थात त्याला फसवेगिरीचं प्रायश्चीत्तं दिलंच पाहिजे.

**विजया** :— आपल्या जीवाचं मोल अितरांना आहे हें या वेळीं विसरून चालायचं नाहीं महाराज!

**सिद्धराज** :— बेटा, तूर्त तसं कांहींच न करतां तू सरळ राजसिंहाकडं चल आविचारानं देशांच नुकसान करूं नकोस. व्यक्तिच्या स्वार्थासाठीं देशाचा बळी पाडूं नकोस!

**विजयसिंह** :— गुरुदेव, दादाशीं वैर करून त्याच्या प्रेमळ मनाला दुखवलं, रायपालासारख्या स्वामिनिष्ठाचा डोळयांसमोर बळी देवून स्वखुशीनं या पिंजऱ्यांत आलो! दादाला मी ओळखतो! अेका शब्दानंही तो मला दुखवणार नाहीं. त्याच्या समोर —, त्या सत्पुरुषांसमोर आतां मी फिरून जावूं तरी कसा! अपमानानं कलंकित झालेलं हें काळं तोंड कसं दाखवूं मी त्यांना? नको, त्यापेक्षां आतां मला

घरदार, राज्य कांहीं नको! आतां फक्त सूड—! सूडाचं अेकच पिशाच्च या नजेरसमोर नाचत आहे.

**विजया** :— अशा अविचारानं मात्र स्वत:चा अध:पात करून घ्याल! मी काय सांगते, माझं अैकायचं ना?

**विजयसिंह** :— ज्या वेळीं दुर्जनला दोस्त केला, त्याच वेळीं माझं अध:पतन झालं!

**विजया** :— हें काय महाराज, असं वेड्यासारखं काय करायचं तें? अेवढ्या-करितांच का आम्हीं अिथं आलों? बाबांचं तरी अैकायचं ना?

**सिध्दराज** :— विजयसिंहा, वैयक्तिक मानापमानाला महत्व देवून तूं आपल्या सामर्थ्याचा दुरुपयोग करीत आहेस! माझ्या आजवरच्या आशा-आकांक्षा तूं अशा रितीनं भस्मसात करणार काय? लहानपणापासून तुम्हांला अंगा-खांद्यावर खेळवलं, राज्याचा आधारस्तंभ बनवलं तें जर असं निरुपयोगी ठरलं तर माझ्या तपश्चर्येचा काय फायदा? परधर्मीयांच्या अत्याचारांपासून भारत—भू मुक्त व्हावी, हा माझा हेतू लहानपणापासून तुम्हांला पढविला त्याचं असं स्वैरवर्तनांतच तूं रुपांतर करणार काय? तूं जो येवढा पराक्रमी झालास, शत्रूला थरकांप भ्यायला लावलंस तें केवळ तुझ्याच हितासाठीं कां? अरे, थोडी विशाल दृष्टी करून देशाकडं पहा; विस्कळीत झालेल्या रयतेकडं पहा; भावाच्या केविलवाण्यां स्थितीची कींव नाहीं का तुला येत—?

**विजयसिंह** :— गुरुदेव, — गुरुदेव —! [ कानांवर हात ठेवतो. ]

**सिद्धराज** :— तुला जर तुझ्या अपमानाचा सूड घ्यावयाचा असेल तर दुर्जनसिंहानं चालविलेल्या प्रयत्नाला; कुटील कारस्थानाला अडथळा निर्माण कर. शत्रू जोपर्यंत बलिष्ट झाला नाहीं तोंच त्याला ठेंचून टाक. चल, अशा स्थितींत तूं आपल्या भावाकडं चल. तुम्हीं दोघे भाऊ अेकत्र झाल्यावर प्रत्यक्ष कळी-काळालाही तुमच्याशीं सामना करायची हिम्मत होणार नाहीं. प्रथम देशाचं हित पहा. पारतंत्र्याच्या गर्तेत रुतला जाणारा देश आधीं आवरून धरा आणि त्यांतच आपल्या अपमानाचा सूड घ्या! वैयक्तिक सुडाचे विचार आतां डोक्यांतून काढून

टाक! चल बेटा, मार्गाला लाग चल! मी गुप्त मार्गानं ———

**विजयसिंह** :— सुडाचे विचार काढून टाकूं—? सर्वांगांत सुडाचं वारं संचारलं आहे. अंतर्याम् पेटलं आहे.

**विजया** :— नका नका महाराज, असा आततातीपणा करूं नका! मनाला आवर घाला. शान्त व्हा महाराज शान्त व्हा!

**विजयसिंह** :— शान्त व्हा? काळजाला घरं पडत असतां मनाला आवर घालूं? — प्रभुराज, आशीर्वाद द्या! [ पाय धरतो व लगेच उठतो व तलवार काढून ] विजये स्वाभिमान हीच माझी संपदा आहे. [ त्वेषानं जातो. ]

**सिध्दराज** :— विजये जा—! युक्ति प्रयुक्तिनं त्याचं रक्षण कर! अेकालिंगजी तुला सामर्थ्य देवो! [ विजया वंदन करते. तिला आशिर्वाद देतात. ती जाते.] जय श्री अेकलिंगजी! जय श्री चंडिकेश्वरा!! स्वाभिमानानं जागृत झालेली पराक्रमी माणसे दुराग्रही आणि संतापी होतात, त्याचं हे प्रत्यंतर पहा. राष्ट्राच्या उदयाला आणि अस्ताला अशींच माणसं कारणीभूत होत असतात! रजपूतांच्या अितिहासांत रक्ताक्षरानीं हेंच लिहिलेले आढळेल! बेटी, अंत:करण-पूर्वक आम्हीं तुला आशिर्वाद दिला खरा—, पण आतां श्री चंडिकेश्वराची इच्छा! जय श्री चंडिकेश्वर! जय श्री अेकलिंगजी!— [ निघून जातात. ]

[ सीन ट्रन्सफर. दुसरा पडदा वर उचलला जातो. छावणींतील बगीचा दिसूं लागतो. खवळलेला विजयसिंह प्र. क. त्याच्या मागोमाग विजया प्र. क ]

**विजया** :— महाराज, आपल्या या अशा वागणूकीनं किती घोर अनर्थ ओढवेल याचा विचार करा. माझं अैका आणि अजूनहि माझ्याबरोबर चला. [ दुर्जनसिंह लपत छपत प्र. क. व तिथंच अेका आडोशाला लपतो. ]

**विजयसिंह** :— नाहीं! विजये मी असा पळून जाणार नाहीं! त्या दुर्जनला योग्य शासन केल्यावांचून मी अिथून मुळींच जाणार नाहीं!

**विजया** :— पण महाराज आतां वेळ अगदीं आणिबाणीचा येवून ठेपली आहे! धवलरायही जवळपास दिसत नाहींत.

**विजयसिंह :—** म्हणूनच म्हणतो, तूं अिथून निघून जा.

**विजया :—** [ त्याला बिलगून ] येवढंही माझं अैकायचं नाहीं ना? "मी कैदी आहे हें पटवून दिलंस तर तूं सांगशाल तें मी अैकेन"! या बोललेल्या शब्दाचाहि आपणाला महाराज अेवढ्यांतच विसर पडला?

**दुर्जनसिंह :—** [ स्वगत ] अेकूण मला येत असलेला संशय खोटा नाहीं तर—! चांडाळणी, हें सारं तुझंच कारस्थान होतं अं! पहातों कशी घेवून जातेस ती!—,

**विजया :—** महाराज या विजयेची अेवढी अिच्छा पुरविणार नाहीं का?

**विजयसिंह :—** विजये मी तुझाच आहे. पण या वेळीं मात्र मला तूं नामर्दपणाचं कृत्य करायला लावूं नकोस! शत्रूचं पारिपत्य हेंच माझं आजचं ध्येय आहे, आणि तें मला पार पाडलंच पाहिजे!

**विजया :—** महाराज, केवढ्यानं बोलत आहांत हें! कुणी अैकलं तर—,

**विजयसिंह :—** आतां मला त्याची पर्वा नाहीं! त्या हरामजाद्याच्या दगलबाजीनं माझं मस्तक कसं भडकून गेलं आहे. तूं मला आतां कांहींच सांगूं नकोस! तूं अिथून निघून जा.

**विजया :—** तेंही आतां शक्य नाहीं. मनानं वरलेल्या भावी पतिबरोबर प्रसंगी प्राणाची आहुति देणं हेंच आम्हां आर्य ललनांचं कर्तव्य आहे. [ धवलराय लपत छपत प्र. क. व विजयसिंहाच्या कानांत कांहीं तरी सांगतो. विजयसिंह आनंदीत होवून विजयेला व धवलरायाला कानांतच कांहींतरी सांगतो. ती दोघेंही सम्मती दर्शवितात. तिघेही जातात. विजयसिंहाची चाहूल कांहींच येत नाहीं हें पाहून खात्री झाल्यानंतर दुर्जनसिंह हळूच बाहेर पडतो. ]

**दुर्जनसिंह :—** अं, अितक्यांतच कुठं गायब झाला? हा सैतान माझं पारिपत्य करणार काय? आतां याला असा मोकळा सोडून उपयोगी नाहीं. हा असा जावून गिरफदार करतो आणि मग त्या विजयेला दाखवतो इंगा! [ जावूं लागतो - तोंच त्याला समोरून नागवी समशेर घेतलेला धवलराय येवून अडवितो.]

**धवलराय :—** खबरदार नराधमा पुढं पावूल टाकशील तर —?

**दुर्जनसिंह :—** पागल! तुम कौन हो?

**धवलराय :—** अजून नाहीं ओळखलंस मला? बरोबर, तेलंगणाच्या विजयाची धुंदी अजून तुझ्या डोक्यात आहे. तेलंगणाची राखरांगोळी करतांना, झालेल्या आनंदांत तूं निमग्न आहेस. तुझ्या आसूरी लालसेनं तूं कामांध बनला आहेस. आणि नेमकं तेंच माझ्या पथ्यावर पडलं. या वेशांतरात मी तुझ्या छावणींत वावरतो आहे पण त्याची तुला दादही नाहीं. आज मला हवा असलेला मोका मिळाला. सूड! समर्थ सूडासाठीं तृषार्त झालेला हा तुझा हाडवैरी धवलराय तुझ्यापुढं अुभा आहे! [ बाजूला पहाणें.]

**दुर्जनसिंह :—** तूं तर मेलास असंच मी समजत होतो!

**धवलराय :—** तुझ्या पापानं मला संजीवनी दिली!

**दुर्जनसिंह :—** [ स्वगत ] मी स्वप्नांत तर नाहीं ना? माझ्या मतीला हा भ्रम तर होत नाहीं नां?

**धवलराय :—** असा भेदरून जावूं नकोस. [ कृत्रिम दाढी मिशा व डोकी-वरचा रूमाल काढून फेंकून देतो.] पहा निरखून पहा आतां माझ्याकडं! आणि काळजाला खात्री पटव. युद्ध-नितीला धाब्यावर बसवून दग्यानं वार केलास. घोड्यावरून मी खालीं आलों खरा; पण ते निव्वळ ढोंग होतं. नव्हे करणं भाग पडलं मला. महाराज पतन पावले, तेलंगणाच्या सैनिकांनीं कच खाल्ली होती; पण माझ्या जीविताची आशा लुप्त झाली नव्हती. दुर्जनसिंहा, तुझ्या दगाबाजीला मी दग्यानं उत्तर दिलं त्याबद्दल तुला आतां पश्चाताप होत असेल नाहीं? स्वतःला घोरीचा अनुयायी समजतोस पण त्याची बुद्धिमत्ता तुझ्यांत खास नाहीं. पृथ्वीराजानं सतरा वेळा जीवदानाची भिक्षा दिली त्याच पृथ्वीराजाला हातीं गवसल्या बरोबर यमधर्माची वाट दाखवणारा तुझा गुरु अलौकीक होता यात शंकाच नाहीं. त्याचा आदर्श तुझ्यांत उतरलेला नाहीं. स्वतःच्या हातानं तयार केलेल्या सापळ्यांत आज तुझीच पूर्णाहुति पडणार आहे.

**दुर्जनसिंह :—** पण त्या आधीं —, [ झटकन तलवारीचा वार करतो. धवलराय मोठ्या कुशलतेनं वार अडवून ]

**धवलराय :—** खरोखरच तुझी कींव करावीशी वाटते. अरे दग्या फटक्याचे दिवस विसरून जा आतां. [ दुर्जनसिंह लगेच दूर होवून बागेंतून निसटून जाण्याचा प्रयत्न करतो. पण त्याच्या समोरून विजयसिंह येवून त्याला अडवतो. दुर्जन दचकतो. धवलराय बेफाट हंसतो. ]

**विजयसिंह :—** नाहीं दुर्जन! ती वेळ आतां निघून गेली. मदतीला आतां कोणी येणार नाहीं. तुझ्या बुद्धिबळाला आज मी जिंकलं! धवलराय, बागेच्या फाटकापाशीं उभे रहा आणि या मांगाच्या मदतीला जर कोणी आलाच तर त्याला तिथंच अल्लाच्या भेटील पाठवा. [ धवलराय व विजया जातात ] दुर्जनसिंहा, आतां आत्मसंरक्षणाची तयारी कर.

**दुर्जनसिंह :—** (बेदरकार बनून) हं! असलीं भाडोत्री जनावरं मारण्यांत कसला शूरपणा! तूं काय माझ्या बरोबर टीकाव धरणार —?

**विजयसिंह :—** अरे, रजपूत लोक शीर धडावेगळं झालं असतांनासुद्धां शत्रूला पाणी पाजतात मग माझं शीर तर माझ्या धडावर शाबूत आहे अजून!

**दुर्जनसिंह :—** राजा, तुझ्या रोमरोमांत हिंदुच्या अस्वाभाविक शूरपणाच्या गप्पा आणि नीति युद्धाचे आघाडे जोंपर्यंत कायम आहेत, तोंपर्यंत तूं आमच्याशीं युद्ध करण्यांत कधींही विजयी होणार नाहींस. यावेळीं तूं या छावणींत अेकटा आहेस. स्वसंरक्षणाची, मुत्सद्देगिरीची भाषा सोडून या दुर्जनाला युद्धाचं आव्हान देणं सोपं काम नाहीं —!

**विजयसिंह :—** दुर्जनसिंहा, तुझ्या या वाग्युद्धाचा माझ्यावर आतां कांहींच परिणाम होणार नाहीं! तुझ्यासारखा निमकहराम ———

**दुर्जनसिंह :—** वां! हा न्याय तर खासा आहे तुझा! भावाच्या बंदिखान्यांत सडून सडून मेला असतास तिथून तुला सोडवणारा तो मी नीमकहराम अं?

**विजयसिंह :—** उलट्या काळजाच्या बेरडा तुझ्यावर विश्वास ठेवला, भावाच्या विरुद्ध गेलो त्याचे पांग अशा रितीनं फेडलेस काय?

**दुर्जनसिंह** :— [ हंसून ] स्वत:च्या देशापेक्षां ज्याला पऱ्या श्रेष्ठ वाटतात, पोरींच्या नेत्र कटाक्षांनीं ज्याचं हृदय घायाळ होतं, त्याला हे असले शब्द बोलायला लाज वाटली पाहिजे!

**विजयसिंह** :— पाजी माणसा, तुझीं पापं पूर्ण झालीं म्हणूनच आज तूं माझ्यासमोर आलास! बदमाश, बोल,— केव्हांपासून हा दगलबाज गुप्त हेराचा धंदा पत्करलास?

**दुर्जनसिंह** :— ज्यावेळीं राणा विजयसिंहानं अिथून कोल्ह्याप्रमाणं पळून जाण्याचा बेत केला त्याच वेळीं!

**विजयसिंह** :— तोंड संभाळ! हा सिंह तुझ्यासारख्या दगलबाज कोल्ह्याला भिवून पळून जात नसतो कधीं!

**दुर्जनसिंह** :— मी कोल्हा! आणि ज्याला राज्य नाहीं दुसऱ्याच्या दाराशीं नाक घांसत आलेला तूं तो सिंह?

**विजयसिंह** :— हरामखोरा, तुझे कारस्थानाचे दिवस संपले. नाहींतर माझं पारतंत्र्य अितक्या अुघड रितीनं तूं कधींच बोलून दाखविलं नसतंस! दगलबाज माणसा, तुझी दगलबाजी अुघड झाली! —

**दुर्जनसिंह** :— सगळंच अुघड झालं आहे आतां! विजयसिंहा, तूं माझा अिथं कैदी आहेस.

**विजयसिंह** :— तुझा कैदी—?

**दुर्जनसिंह** :— हां हां माझा कैदी!

**विजयसिंह** :— जीभ हांसडून काढीन!

**दुर्जनसिंह** :— चूप रहा बदमाष! राज्यापरी राज्य घालवून कुत्र्याप्रमाणं अिथं तुकडे चघळीत बसला आहेस ही तुझी बहादुरी! [ विजयसिंह क्रोधाने वार करतो. तो आपल्या समशेरीवर अडवून ] पोरा, तुला वेड तर लागलं नाहीं ना? माझ्याबरोबर तूं युद्ध करणार? अरे, तुला आणि त्या राजासिंहाला पायाशीं नमवून हा दुर्जन आपल्या अपमानाचा बदला घेणार आहे. त्या घमेंडखोर रंजनेला तुमच्या डोळ्यांदेखत हा दुर्जन बटीक करणार!

**विजयसिंह** :— खामोष सैतान! [ आवेशानं तुटून पडतो. दुर्जन सावधगिरीनें वार अडवितो. लढाई सुरू होते. अेकमेकांना वार लागून दोघेहि रक्तबंबाळ होतात. झोकांड्या जावूं लागतात. तलवारीच्या आश्रयानं उभा रहाण्याचा प्रयत्न करीत असतांना विजयसिंह खालीं पडतो. व तीच संधि साधून सर्व बळ अेकवटून दुर्जनसिंह झोकांड्या खात खात विजयसिंहाजवळ येतो. व आता विजयसिंहावर वार करणार तोंच धवलराय व विजया प्रवेश करतात. ]

**धवलराय** :— [ जवळील जंबीयाचं निशाण दुर्जनसिंहाच्या छातीवर धरून फेकतो. मर्मस्थानावर जंबिया लागल्यामुळं दुर्जनसिंह एक अक्राळविक्राळ आरोळी मारून उताणा पडतो. व तिथंच प्राण सोडतो. ] फार पापं केलीस. [ त्याच्याजवळ जावून ] फार उलाढाल्या केल्यास, स्वस्त विश्रांति घे आतां इथं. [ विजयसिंहाला उठवतो. विजयसिंह शुद्धींत येतो. ]

**विजयसिंह** :— [ धवलरायास मिठी मारून. ] वीरश्रेष्ठ किती थोर कामगिरी बजावलीत!

**धवलराय** :— राणाजी, या सेवकाचं ते एक कर्तव्यच होतं. महाराज आता अिथं थांबण्यांत अर्थ नाहीं. पुढचा मुक्काम आपणाला फार जलद गाठला पाहिजे. राजसिंह महाराज तिकडे संकटांत आहेत. चलावं. [ सर्वजण जातात. ]

[ पडदा पडतो ]

---

## [ प्रवेश ६ वा ]

[ स्थळ :- रणमैदान. तलवारींचा खणखणाट. दीन दीन हर हर महादेव अशा गर्जना होत आहेत. अेकमेकांवर अेकमेकांकडून हल्ले होत आहेत. मुसलमान सैनिकांचा जोर वाढत आहे. कांहीं वेळानं रक्तानं न्हालेला राजसिंह बहादूरखाँ बरोबर लढत प्र. क. बहादूरखाँचे मदतीस त्याचे सैनिक येतात. श्रमल्यामुळें राजसिंहाची तलवार फिरेनाशी होते. तोंच बहादूरखाँचे एका वाराने राजसिंहाची तलवार उडते. निशस्त्र होतांच मोगल सैनिक राजसिंहाला पकडतात. सर्वत्र शांतता होते.

**बहादूरखाँ** :— क्यौं राणाजी,— आप तो अभी हार गये? अच्छा तो अब आप हमारे बंदिवान हो गये!

**राजसिंह** :— बंदिवान! बंदिवास!! हाय रे दुर्दैवा!! स्वातंत्र्यासाठीं झटणाऱ्या आर्यांना बंदिवास! नाहीं! याला अुपमा नाहीं. कोणत्याही इतिहासांत या नामुष्कीबद्दल अेक अक्षरसुद्धां लिहिलेलं नाहीं आणि कधीं लिहिलं गेलंहि नसतं, पण आम्हीं आमचं कर्तव्य विसरलों! सार्वत्रिक कल्याणाची संघटनेची पर्वा बाळगली नाहीं. व्यक्ति मोह आणि स्वार्थ साधण्यांत राष्ट्रेंच्या राष्ट्रं गमावून बसलों. अमर्याद आणि पवित्र ध्येयाला मर्यादीत आणि अपवित्र केलं! मग या बंदिवासाची करूण कहाणी आम्हांला नको का अैकायला —?

**बहादरखाँ** :— राणाजी, अब आप क्या सोच रहे है?

**राजसिंह** :— खाना, या रजपूताची अेक विनंति मान्य कर आणि फिरून माझ्या हातीं तलवार दे! लढतां लढतां या मायभूमीच्या पवित्र कुशींत मला मरण येवूं दे.

**बहाद्दरखाँ** :— राणाजी, आपकी बहाद्दुरी खतम हो गयी! वो चिव्वा अुधर फंस गया: और आप अिधर हार बैठे। आपको गिरफदार करके तख्त् के सामने पेश करनेकी आलेशानकी फर्मान हैं। आप अपनी जान बचाना चहाते हो न? याचना करो। मुलतानके सामने याचना करो।

**राजसिंह** :— याचना! खानसाहेब, दयेची याचना स्वप्नांतहि खरा रजपूत करीत नसतो!

**बहाद्दरखाँ** :— अब तो करनी होगी!

**राजसिंह** :— शक्य नाहीं!

**बहाद्दरखाँ** :— सीर्फ अेकहि शर्थपर! राणाजी आप मुसलमान बन जाव।

**राजसिंह** :— जराकृश झाला म्हणून सिंह कांहीं पारतंत्र्याचं वाळेलेलं गवत खात नाहीं!

**बहाद्दरखाँ** :—खामोष बदमाष! चिव्वेका चूँ चूँ बिल्लीके मूँहमेही होता हें! [ सैनिकास उद्देशून— ] ले जाव अिस बदमाशको। जंजीरसे जखड दो। [ राणी रंजना प्रवेश करते. ]

**रंजना** :— हं खबरदार नराधमा! —

**राजसिंह :—** रंजने! [ सुटायची धडपड करतो.] रंजने, तूं हें काय केलंस?

**रंजना —** नाथ, पतिबरोबर सहगमन करणं हेंच आम्हां आर्य स्त्रीयांचं कर्तव्य आहे. पतीसहगमन हाच आमचा मोक्ष आहे.

**बहादूरखाँ :—** राणीसाहेबाँ, चहाती हो तो आप यहाँसे वापस जा सकती हो। ये मोंगल सेनापति बहादूरखाँ अपनी माँ और बेहेन के इज्जतको बहोत मानता है। बेहेन, इज्जत चहाती हो तो सुलतानके सामने आप मत आव। अल्लाके वास्ते आप यहाँसे वापस चली जाव। ये बहादूरखाँ आपको इज्जतसे पहूँचा देगा।

**रंजना :—** भाऊुराया, आम्हीं आर्य-ललना दुसऱ्यांच्या दयेवर जगत नाहीं! जिथं महाराजांचा देह तिथंच या रंजनेचाहि देह पडेल!

**बहादूरखाँ :—** आपकी धन्य हो बेहेन। लेकिन अल्लाको ये मंजूर नहीं है। [ तोंच हरहरमहादेव अशी गर्जना आंत होते. व तलवारींचा खणखणाट सुरू होतो. रजपूतांची अेक तुकडी सिद्धराजांच्या देखरेखीखालीं मोंगल सिमेवर तुटून पडते. सिद्धराज योद्धयाच्या वेषांत प्र. करतात. ] सैतान! तुम कौन हो?

**सिध्द्राज :—** तेरा बाप सिद्धराज!

**राजसिंह :—**
**रंजना :—** } गुरुदेव! शेवटीं आपणालाहि शस्त्र धरावं लागलं ना?

**सिद्धराज :—** वत्सानों, श्री अेकलिंगजीची अिच्छाच तशी होती! [ खानावर तुटून पडतात. रंजनाहि राजसिंहास धरलेल्या सैनिकांवर चाल करून जाते. तोंच अेक मोंगल सैनिक प्र. क. तिला अडवतो. त्याच्यावर ती तुटून पडते. त्याला हटवीत हटवीत ती विंगमध्यें जाते. अिकडे गुरुदेवांचे वक्षःस्थळीं खानाचा वार लागतो. त्या सरशीं गुरुदेव खालीं पडतात.]

**राजसिंह :—** गुरुदेव, गुरुदेव! अरेरे काय पहातो मी हें! [ सुटकेची धडपड करतो. ती व्यर्थ जाते.]

**सिध्द्राज :—** वत्सा, चोहोंकडे शुद्ध सनातन धर्माचं मूळ स्वरूप झांकून जावून व्यक्ति तितक्या प्रकृति होवून स्वैराचार माजल्यामुळं देव आतां लवकरच जागा होअील! आचार प्राधान्यांखालीं अनाचाराचं माजलेलं स्तोम, देवाला मान्य

नाहीं! ह्या भयंकर माजलेल्या नरमेध यज्ञाला तो आतां कंटाळला आहे. नीरपेक्ष रीतीनं धर्म आणि राष्ट्र रक्षणांसाठीं झटणाऱ्या राजन्य वर्गाचा तो आतां अधिक अंत पहाणार नाहीं. स्वातंत्र्याची तीव्र आंच आतां वीरांच्या वीरतेला [ कळवळतात ] जागृत करील! आणि लवकरच राष्ट्रवीरांचा जय होईलं —! [ पडद्याच्या आंत रजपूतांची रणभेरी जोरजोरांत वाजते ]

**बहादूरखाँ** :— ये और कोन आगया? [ सैनिकांस उद्देशून ] सैनिकहो, ले जाव अिसे। [ सैनिक राजसिंहास नेतात – अेका अेकीं मोंगल सेनेवर जोराचा हल्ला होतो. तलवारींचा खणखणाट व आरोळ्यांनीं वातावरण तंग होतें. ] किसकी आवाज है यह! किसने हमला चढाया! [ त्या दिशेकडं पाहून ] बिजली की तरह चमकनेवाली किसकी समशेर है वो? यह अल्ला! मै क्या देख रहा हूँ! हमारी सेना पिछे क्यौं हट रही है? [ रक्तबंबाळ झालेला अेक मोंगल सैनिक प्र. करतो ] आखीर यह मामला है ही क्या?

**सैनिक** :— हुजूर, राणा विजयसिंहानें हमला चढाया! उनके पास काफी सेना है!

**बहादूरखाँ** :— बेवकूफ! गांजा तो नहीं पी? वह सैतान तो वहीं गिरफदार हो चुका है!

**सैनिक** :— नहीं नहीं हुजूर! दुर्जनजीको मारकर वो सैतान वहाँसे निकल पडा. देखो, ओ देखो अिधरही आ .......... [ कळवळून ] आ...आ... रहा है! [ मरून पडतो. ]

**सिद्धराज** :— [ विजयसिंहाचं नांव अैकल्यामुळं उठण्याचा प्रयत्न करतात परंतु जबरदस्त वार लागल्यामुळं त्यानां उठतां येत नाहीं. ] विजय! माझा विजयसिंह आला!! जय श्री अेकलिंगजी! जय श्री चंडिकेश्वरा!!

**बहादूरखाँ** :— [ तलवार उपसून ] रणबहादूरो! याद रख्खो! जान जाय पर पिछे मत हटना. चलो, तेजीसे आगे चलो, तेजीसे समशेर चलाओ! देखो, उपरसे फुलों की वर्षाव हो जायगी! शाब्बास बहादूरो! बढो–, आगे बढो! [ आंतमध्यें दीन दीन हरहर महादेवच्या गर्जना ] ओ! लेकिन यह क्या हुआ?

[धांवत जाणार तोंच — दोन हातीं दोन तलवारी घेतलेला असा कृतांतासारखा दिसणारा विजयासिंह प्रवेश करतो.]

**विजयसिंह :—** [गुरुदेवाकडे नजर जावून] गुरुदेव! [खानाकडे चवताळलेल्या दृष्टीनें पाहून अेकदम खानावर तुटून पडतो. क्षणार्धांत खान विजयसिंहाच्या जबरदस्त फटक्यानं जखमी होवून खालीं पडतो. रजपुतांच्या गर्जना सारख्या होतच असतात. विजयसिंह, गुरुदेवांच्या जवळ धांवत जावून त्यांना आपल्या मांडीवर घेतो. तोंच धवलराय प्रवेश करतो.] धवलराय, दादासाहेबांना सोडवा जा लवकर. [धवलराय निघून जातो.] गुरुदेव! गुरुदेव!!

**सिध्दराज :—** वत्सा, [त्याला जवळ घेवून त्याच्या तोंडावरून हात फिरवतात.] शेवटीं माझं अेकलिंगजीनं अैकलं! [पडद्याच्या आंत रजपूतांच्या जयाची रणभेरी वाजते, जय जय हरहर महादेव, श्री एकलिंगजीचा अेकच जयघोष सुरू होतो. अेका बाजूने राजसिंह, राणी रंजनेला व पुरुषी वेषांत असलेल्या विजयेला कुरवाळीत प्रवेश करतो. पाठोपाठ धवलरायही असतो. सर्वजण गुरुदेवांना वंदन करतात. विजयसिंह उठून राजसिंहाला मिठी मारतो.]

**बहादरखाँ :—** [प्राणांतिक वेदनेनं विव्हळत असतो.] बेहेन, अ...अ... अप... ने ये पराया भाअी.......भाअीका आखीरी प्रणाम....! [राणी रंजनेला प्रणाम करतो. व प्राण सोडतो, राणी रंजना त्याच्या पायाला स्पर्श करून वंदन करते. व त्याच्या तोंडावर वस्त्र टाकते.]

**सिध्दराज :—** विजयासिंहा, इकडे ये! [विजयासिंह जवळ जावून बसतो.] विजये-बाले तूहि इकडे ये! [विजयाहि जवळ जाते. तिचा हात विजयासिंहाच्या हातीं देतात.] अखंड सौभाग्यवती भव! राजासिंहा पाहिलेंस? [वर बोट दाखवून] ढगांआडून पूर्ण प्रकाशांत, पूर्णरुपानं विकसीत झालेला चंद्रमा मनाला किती आल्हाद देत आहे माझ्या!

**राजसिंह :—** [सद्गदून] पण गुरुराज, तो लांच्छित चंद्रमा आहे!

**सिध्दराज :—** आणि म्हणूनच तर त्याची शोभा अवर्णनीय आहे. वत्सानों, माझी [वेदना असह्य होतात - कळवळून] मा....झी अी...अी-ती कर्तव्यता संपली....! देशाला सां...भा.. ळा. [सर्वांना आशिर्वाद देतात.]

जय श्री अेकलिंगजी! जय श्री चं......चं...डि....के...श्व...रा !! [प्राण सोडतात.] [राजसिंह, विजयसिंह, धवलराय, रंजना व विजया गुरुदेवांच्या चरणाला स्पर्श करून वंदन करतात.]

**विजयसिंह** :— दादासाहेब, अविचारानं देशाच्या घाताला मी कारणीभूत झालों. तुमचं अंतःकरण पारखतां आलं नाहीं मला. पितृतुल्य गुरुदेवांना अंतरलों! दादासाहेब, पश्चातापानें होरपळून निघालेल्या या कृतघ्नाला क्षमा करा. [राजसिंहाचें पाय धरतो.] गुरुदेवांच्या दिवंगत आत्म्याला साक्ष ठेवून प्रतिज्ञा करतो कीं, या पुढें हा विजय [आपली तलवार काढून राजासिंहाचे पायावर ठेवीत] या चरणांचा पाअीक राहून आजन्म देशाची सेवा करील!

**राजसिंह** :— अूठ विजय, [उठवतात व हृदयाशीं धरतात] श्री अेकालिंगजी तुला सामर्थ्य देवो! [त्याची तलवार त्याला परत देतात] [विजयसिंह ती मस्तकाला लावून म्यान करतो.]

**धवलराय** :— महाराज, हा धवलरायहि आजपासून या पायांचा पाअीक झाला. [पाय धरतो.]

**राजसिंह** :— [त्याला उठवून मिठी मारतात] वीरश्रेष्ठ! तुमच्या सारख्या शूर सेनानीची आज मेवाडला गरज आहे. आमचे रायपालजी आम्हाला सोडून गेले, पण तुम्हीच आतां आमचे रायपालजी! [गुरुदेवांकडे पाहून] गुरुदेव, तुमचा आशिर्वाद फळाळा आला. वीरांची वीरता जागृत झाली! माझ्या लाडक्यांनो, गुरुदेवांच्या चरणाला साक्ष ठेवून स्वर्गी गेलेल्या त्यांच्या आत्म्याचा आशिर्वाद मागूंया! [राजसिंह, विजयसिंह, धवलराय – गुरुदेवांच्या शवाजवळ जातात. तलवारींना साक्ष ठेवून गुडघे टेकतात. रंजना व विजया उभ्या राहून वंदन करतात.]

**राजसिंह** :-
**विजयसिंह** :-
**धवलराय** :-
} गुरुदेव! आपल्या दिव्य संदेशाची मशाल या हृदयांत अखंड तेवत राहूं दे! [वंदन करतात – पडदा पडतो]

—— राष्ट्रगीताला सुरवात ——

— समाप्त —